# चंद्रशेखर

अर्थात्

# समर्थ भिकारी

लेखक—

भार्गवराम विठ्ठल वरेरकर

सन १९३४

किंमत एक रुपया

# प्रस्ताव



विल्सन बॅरेट या इंग्रज नाटककाराच्या "Sign of the cross" या नाटकाचें प्रस्तुत नाटक हें रूपांतर आहे. खिश्चनांच्या जागीं वैष्णव आणि रोमनांच्या जागीं कापालिकांची योजना करतांना जेवढा फरक करावा लागला तेवढ्या फरकापेक्षां मूळ लेखकाचें हृद्गत बिघडविलेलें नाहीं.

महत्वाचा असा एकच फरक केला आहे तो नाटक आनंदपर्यवसायी करण्याचा. मूळांत नायक नायिका याना सिंहाच्या तोंडी दिलें आहे. पण प्रस्तुत रूपांतरांत खिश्चनाच्या जागीं वैष्णव कल्पिल्यामुळें भक्तांच्या संकटांना धांवणाऱ्या ईश्वराला--विष्णुला शोभेल अशाच प्रकारचा शेवट करावा लागला. Crucifiction हा खिश्चनाचा चर्मोत्कर्ष असल्यामुळें मूळ नाटक सहाजिकच दुखःपर्यवसायी झालें आहे. हें रूपांतर दुःखपर्यवसायी केलें असलें तर वैष्णवांच्या आराध्य देवतेचा उपमर्द झाला असता.

कै. नानबा गोखले यांच्या 'लोकमान्य नाटक मंडळी' नें कांहीं दिवस या नाटकाचा प्रयोग केला होता. पण त्यावेळीं नटांचा संच अनुरूप न मिळाल्यामुळें नानबा गोखले यांनीं प्रयोग पुढें बंद ठेवला. लिहून पडून राहिलेलें हें १९१६ सालांतील हस्तलिखित दुरुस्ती न करतां तसेंच छापलें आहे.



ॐ नमो भगवते वासुदेवाय

# समर्थ भिकारी

## अर्थात्

# चंद्रशेखर



## अंक पहिला



### प्रवेश पाहिला

पाटलीपुत्रांतील रस्ता.

( विष्णुदास, व वैष्णवचरण प्रवेश करितात. )

**वैष्णव**—आतां याला उपाय काय ?

**विष्णु**—उपाय एक नारायण. आमच्या अल्पबुद्धीनं उपाय शोधण्याचा प्रयत्न करणं ह्मणजे नुसता वेडेपणा आहे. आपण आपलं कर्तव्य करूं या. फलाफलाचा सारा भार भगवंतावर.

**वैष्णव**—तर मग आतां आपली काय आज्ञा आहे ? इथंच वेष बदलून राहावं किं देशत्याग करावा ?

**विष्णु**—देशत्यागाखेरीज गत्यंतरच नाहीं. गुप्तवेषानं आतां अधिक दिवस निभाव लागणार नाहीं. राजा उग्रचंडाच्या गुप्त हेरांची आमच्यावर फार करडी नजर आहे. आह्मी वैष्णव असल्याचा थोडासा पुरावा सापडतांच ते आमचा नायनाट केल्यावांचून राहाणार नाहींत. खुशाल नायनाट करोत, मला त्याची काडीभरही पर्वा वाटत नाहीं. हा क्षणभंगुर देह एक दिवस केव्हां तरी पडणारच. रोगानं सडून रखडून मरण्यापेक्षां उग्रचंडाच्या तरवारीच्या एका फटक्यानं

मेलेलं काय वाईट ! पण वैष्णवचरण, आज ज्या विष्णुमूर्तीच्या सेवेंत हें जीवन घालवलं, त्या पवित्र मूर्तीला त्या कापालिकाच्या पापी हाताचा स्पर्श कसा होऊं देऊं ?

वैष्णव—हीच तर सर्वांत मोठी काळजी आहे.

विष्णु—काल त्यानं आमच्या आवडत्या विष्णुमंदिराला आग लावून दिली, त्यावेळीं मोठया प्रयासानं ती मूर्ती घेऊन कसाबसा निसटलों. श्रीकृष्णाची कृपा—दुसरे काय ? सारीं विष्णुमंदीरं मूर्तीसह एकाच दिवसात अग्निदेवाच्या उदरांत नाहींशीं झालीं. त्या चांडाळांच्या अनुचरांनीं शेवटीं मंदीराची राख सुद्धां पायाखालीं तुडवली. वैष्णवचरण, शांतवृत्ती वैष्णवाची माता आहे खरी, पण कालचा प्रसंग आठवला म्हणजे तीची सुद्धां विस्मृति होते. मी देशांतील सर्व वैष्णवांना आज कुंजवनांत बोलावलं आहे. सर्व एकत्र जमा होऊं आणि मग विष्णुमूर्ती घेऊन या पाप भूमीला शेवटचा नमस्कार करूं.

वैष्णव—आतां वैष्णव तरी कितीसे उरले आहेत ? नरपिशाच उग्रचंडाच्या कोपवन्हीला बहुतेक सर्वांच्याच आहुती पडल्या आहेत. आमच्या सारखेच कुठं दहा पंधराजण कसेबसे लपून छपून राहिले आहेत, एवढंच.

विष्णु—वैष्णवचरण, राहिले नाहींत,—भगवंतानं या मूर्तीच्या सेवेकरितां त्यांना राखलं आहे. आतां ही मूर्ती नेऊन वृंदावनांत स्थापन केली पाहिजे, हेंच प्रत्येकाचें कर्तव्य. कांहींही करून एवढी मूर्ती घेऊन आपण एकदांचें येथून निसटलों म्हणजे मिळवली.

वैष्णव—पण निवेदिता आणि निर्माल्य यांना कुणाच्या स्वाधीन करायचं ?

विष्णु—त्यांना कुणाच्या स्वाधीन करणार ? माझा आवडता शिष्य कृष्णचरण यानं मरतांना आपलीं हीं दोन मुलं माझ्या पदरांत घातलीं. मी तीं माझींच समजून आजवर त्यांचं संगोपन केलं. तीं दोघंहीं महान् भगवद्भक्त आहेत. त्यांना या यमपुरींत एकटीं टाकून कसा जाऊं ? जशी ती श्रीमूर्ति तशींच निवेदिता आणि निर्माल्य. श्रीमूर्ती बरोबर त्यांनांही मी वृंदावनांत घेऊन जाईन.

वैष्णव—काल रात्रीचा भयंकर प्रकार घडल्या पासून तीं दोघंही आपल्या भेटीसाठीं फार उतावीळ झालीं आहेत. काल मंदिरांतून सारे वैष्णव जेव्हां

पळून गेले त्यावेळीं मी त्यांना माझ्या घरीं घेऊन गेलों. पण ती जागा तरी सुरक्षित आहे कुठं ? उग्रचंडाचे हेर प्रत्येक घरांत शिरून वैष्णव तेवढा हुसकून काढून जिवंत जाळीत आहेत :–हाय भगवन् !—

**विष्णु**—जा तुम्ही आतां. काळोख पडेपर्यंत त्यांना घराबाहेर येऊं देऊं नका. मी गयेच्या महंत महाराजांनां सर्व हकिगत कळवली आहे. तिकडून कुणी तरी आजच येईल असं मला वाटतं. त्याच्या शोधासाठीं मला आधीं गेलं पाहिजे.

**वैष्णव**—काय ही नरहत्येची आवड ! पशूपेक्षांही ही वृत्ति नीचतम नव्हे का ? उग्रचंडा ! या अघोर कृत्यांबद्दल तुला केव्हांही अनुताप होणारच नाहीं का ?

**विष्णु**—वैष्णवचरण, धर्माच्या नांवाखाली या जगतांत जितके अत्याचार घडत आहेत तितके एकाद्या पापाच्या बळानं सुद्धां होणार नाहींत. मला वाटतं, उग्रचंडाची ही वैष्णव हिंसा, हे मंदिराचे नाश, हे मूर्तिभंग, सर्व कांहीं अत्याचार भावी शुभकालाचे द्योतक आहेत. जेव्हां धर्माची ग्लानी होते तेव्हांच भगवंताचा अवतार होतो. ही आमची पूण्यभूमी भारत ! धर्मासाठीं पशूंचा बळी–धर्मासाठीं पक्षांचा वध–धर्मासाठीं नरबळी–धर्मासाठीं अभक्ष्यभक्षण–धर्मासाठीं अपेयपान !– जिकडे तिकडे धर्माच्या नांवाखालीं आत्मसेवा, जिव्हालौल्य आणि विषयोपभोगाची घाणेरडी लालसाच दिसून येते आहे. भगवंता, या लालसेवर हें आमचं भारतवर्ष केव्हां विजय मिळवील बरं ? वैष्णवचरण, उग्रचंडाला ही नरहत्या कां आवडली आहे तुम्हांला ठाऊक आहे का ? त्याला एका शाक्त कापालिकानं उपदेश दिला आहे आणि एक हजार वैष्णवांचा वध केल्यास तूं अमर होशील असं सांगितलं आहे. रोगांनीं क्षणांत जर्जर होणाऱ्या या हाडामासाच्या देहाला आहे हेंच आयुष्य असहनीय होतं, त्याला अमरत्व कशाला ? अमरत्वासाठीं दुसऱ्याचं आयुष्य अल्प करायचं का ? खरोखर वैष्णवचरण, उग्रचंडाच्या पापाचे घडे भरत आले आहेत असंच मला वाटतं. त्याचा समूळ विध्वंस अगदीं जवळच दिसतो आहे.

**वैष्णव**—तथास्तु.

**विष्णु**—जा तुह्मी आतां. मात्र निवेदिता आणि निर्माल्य यांना घराबाहेर पडूं देऊं नका. ध्यानांत ठेवा, खऱ्या परीक्षेचा दिवस आजच आहे.

( जातात )

## प्रवेश २ रा



( कर्कोटक, व कर्नाटक फांशानीं खेळत आहेत. )

**कर्कोटक**—हं ! डोळे आणि कान ताब्यांत ठेव. नुसते फासे चालवायचे नाहींत. वैष्णवांना गळफांस घालणं हें आपलं मुख्य कर्तव्य आहे.

**कर्नाटक**—पण बुवा, हें वैष्णवांशीं एवढं वैर कां ?

**कर्को०**—वैर कां ? अरे मूर्खा, आह्मां शाक्तांचा तो धर्मच आहे. बोकडाच्या प्रेताचा स्वाहा करण्याची आह्मांला परवानगी आहे–कुत्र्यांना नि लांडग्या-कोल्ह्यानांच कांहीं एवढा अभिमान नको, आह्मीं देखील प्रेताची हाडं खुशाल चघळतों. दारुचा सुगंध वैष्णवांना नकोसा होतो–आह्मी दारुला "कारण" असं नांव देऊन हाडांवरचं मांस दारूनं धुऊन काढतों. वैष्णव लोक स्वर्गाची अपेक्षा धरून टाळ कुटीत जमिनीवर लोटांगणं घालतात, पण आह्मीं भांगेच्या सेवनानें घरबसल्या स्वर्ग मिळवतों. शक्तिपूजेच्या नांवाखालीं वेश्यागमन आणि परदारासेवन आह्मांला उजळ माथ्यानं करतां येतं. या सर्व गोष्टी या बेट्या वैष्ण-वांना खपत नाहींत म्हणून त्यांचं आमचं हाडवैर !

**कर्ना०**—आतां उमजलं ! ठीक आहे. आपले वैरी नाहींसे करून वर रगड पैसा मिळवून देण्याची ही संधी दिल्याबद्दल महाराजांचे आमच्यावर फार फार उपकार होत आहेत. महाराज उग्रचंड खरोखर साक्षात् जगदीश्वर आहेत.

**कर्को०**—एका वैष्णवाच्या डोक्याला दोन हजार सुवर्ण मुद्रा ! काय हें बक्षीस ! खरोखर मगध देशांतला प्रत्येक माणूस जर वैष्णव असता तर काय बहार झाली असती ?

**कर्ना०**—अगदीं बरोबर बोललास–हं लाव–बांकडे तेरा. मगध देशांत वैष्ण-वांचं नुसतं नांव सुद्धां रहातां कामा नये. तरच आपणांला कांहीं लाभ होईल.

**कर्को०**—लाभ पण लाभ ! आणि मजा काय ! वाघाच्या शिकारींत असली मजा असते कीं काय कोण जाणें ! या शिकारींत स्वतःला कसलं म्हणून भय नाहीं ! बस्स ! घर कीं मार, तरणा मारा, म्हातारा मारा, बायका

मारा, कोवळीं पोरें चिरून काढा. हे बेटे वैष्णव 'मारूं नको'सुद्धां म्हणत नाहींत. हात वर उचलण्याचं तर नांवच नको.

कर्नाo—( पाहून ) कोणरे तो ? आंगाला आग लागल्यासारखा झगझगीत पोशाख करून माजलेल्या बैलासारखा मोठ्या डौलानं कोण बरं हा जातो आहे ?

कर्कोo—काय ? ओळखलं नाहींस ? हे सेनापती, महाराज चंद्रशेखर.

कर्नाo—खरोखर मी जर चंद्रशेखर असतों तर किती मजा झाली असती ?

कर्कोo—भलतीच इच्छा करण्यांत काय अर्थ आहे ? वेड्या, तूं यःकश्चित गुप्त हेर. तुला असली भलती महत्वाकांक्षा काय होय ? चंद्रशेखर म्हणजे काय बाजारची भाजी आहे ? राजा उग्रचंडाचं सारं राजेपण चंद्रशेखर आहे म्हणून. एरव्हीं विचारतो आहे कोण त्याला !

कर्नाo—काय चमत्कार आहे ! मार्गी माणसं सारखींच. पण एक होतो लक्षापति तर एक एकदम भिक्षापती !

कर्कोo—आपलीच गोष्ट घेईनास. कपाळावर टिचायला आपल्याकडे एक तांब्याचा तुकडासुद्धां नाहीं. पण परवां चंद्रशेखरानं महाराजांना मेजवानी दिली तिला खर्च झाल्या एक लक्ष सुवर्णमुद्रा. आहे कीं नाहीं मजा ?

कर्नाo—एक लक्ष ? अरे बापरे, साऱ्या पृथ्वीवर इतकी संपत्ती आहे तरी का ?

कर्कोo—मिळेल–मिळेल–वेड्या, एखाद दुसरा तरी वैष्णव पकड, कीं जन्माचं दारिद्र्य दूर होईल. कोण बरं तो तिकडून येतो आहे ? कुणी नवखा दिसतो.

कर्नाo—हं लाव–पोबारा–

कर्कोo—थांब आधीं–तुझ्या पोबाराबरोबर हा नवखा अचानक पोबारा करायचा एकादा. आधीं कान सारखे टवकारून धर. ( [illegible] लागतात. एका बाजूनें विष्णुदास व दुसऱ्या बाजूनें माधवदास येतो. )

माधवo—नमो नारायणाय !

विष्णुo—( दचकून ) कोण तुह्मीं ?

माधवo—गदाधराचा दास–गयेहून आलों.

विष्णुo—मला कसं ओळखलंत ?

**माधव०**—मुद्रेवरून.

**विष्णु०**—आपलं नांव ?

**माधव०**—माधवदास.

**विष्णु०**—इकडे कुणी पाठवलं आपल्याला ?

**माधव०**—गयेच्या महंत महाराजांनीं.

**विष्णु०**—हळू बोला. या पाटलीपुत्रांतील दगडांना देखील कान आहेत. त्यांचं काय ह्मणणं आहे.

**माधव०**—त्याचा निरोप मी सर्वांना एकाच वेळीं सांगेन. आपली सर्व मंडळी आज एकत्र जमणार आहे ना ? कोणत्या जागीं ?

**विष्णु०**—अशोकस्तंभाजवळील महावनांत मध्यरात्रीं.

**माधव०**—किती लोक जमतील तिथं ?

**विष्णु०**—एकदां सांगितलंना, कीं इथं दगडानांही कान आहेत. मी जातों.

(जातो.)

**कर्को०**—(स्वगत) आह्मांला सुद्धां भले मोठे कान आहेत! (पुढें होऊन) नमस्कार ह्मातारे बुवा. (तो जाऊं लागतो) कां ? चाललांत कुणीकडे इतक्या घाईनं ?

**माधव०**—थोडं जरूरीचं काम आहे.

**कर्को०**—राहतां कुठं आपण ?

**माधव०**—या प्रश्नाचं कारण ?

**कर्को०**—नाहीं–कारण कांहीं विशेष नाहीं. म्हटलं, आपण फार दूरची मजल मारून आलेले दिसतां. फारच लांबून आलांत वाटतं.

**माधव०**—आज कित्येक दिवस सारखा चालतों आहें.

**कर्को०**—तहान लागली असेल फार आपल्याला ? जवळच आहेत दोनी दुकानं. दारूचीं बरं का !

**माधव०**—तहानेसाठीं एक ओंजळ नदीचं स्वच्छ पाणी असलं म्हणजे झालं. मला जरा घाई आहे. जातों आम्हीं.

**कर्को०**—जातों म्हणतांच का जातां येतं महाराज ? ही उग्रचंडाची राजधानी. येणं होतं स्वेच्छेनं–पण जाणं मात्र पराधीन. विशेषतः गयेहून आलेल्या लोकांनं !

कर्ना०---आपल्यासारख्या लोकांकरितां राजेसाहेबांनीं फार उत्तम सोयी केल्या आहेत. खर्चाची मुळींच ददात नाहीं. बसा ना घटकाभर तिथं.

माधव०---काम झाल्याखेरीज मला एक क्षणभर सुद्धां विसावा घेतां येत नाहीं.

कर्को०---काय काम आहे आपलं ?

माधव०---धन्याचं काम.

कर्को०---कोण धनी आपले ?

माधव---दरिद्रनारायण. ( हळूच जातो. )

कर्ना०---काय म्हणाला ? दरिद्रनारायण ? भाटियानारायण आहे, दोबे नारायण, नारायण मिश्र तर खंडीभर आहेत. हा दरिद्रीनारायण कुठला ?

कर्को०---कर्नाटका, पैशाचा वास येतो रे बाबा इथं. बेटा आला आहे गयेहून. गदाधर-गदाधर-चारदोन वेळां म्हणाला. जातांना धन्याचं नांव सांगतो दरिद्रिनारायण. वैष्णव तर नव्हे हा ?

कर्ना०---असेल किंवा नसेलही. नसला तर बनवूं त्याला वैष्णव आणि नेऊं त्याला शार्दूलाकडे. चल घे पाठ.

( दोघे जातात व अनंगा येते. )

अनंगा---भुजंगराय-छीः नव्हत. हे दुसरेच कुणी दिसताहेत. नाहीं-हे आलेच ते. आतां जरा आपण त्या गांवचीच नाहींसं दाखवावं. ( भुजंग, कुरंग प्रवेश करतात. )

भुजंग---काय अनंगे-कुणीकडे चालली आपली स्वारी ?

अनंगा---बाई, बाई, कोण भुजंगराय ? वसंताचा वारा आंगाला माखून कुठं चालली आपली स्वारी ? दंश करायचा आहे वाटतं कुणाला ?

भुजंग---केला असता तुझ्या अधेराला दंश. पण आतां ते अगदींच काळे पडत चालले आहेत.

अनंगा---मग चाललां आहांत कुणीकडे ?

भुजंग---पूजा करायला-बाई-पूजा करायला !

अनंगा---कुणाची पूजा ? कादंम्बिनी देवीची ?

भुजंग---छे छे ! कादंबरी देवीची. पण तूर्त विजयेवरच भागवून घेतों आहे.

**अनंगा**—ही विजया कुठली आणखी ?

**भुजंग**—अग शांभवी. शांभवी माहीत आहे तुला? शंकरानं ज्या वेळीं हाला-हालपान केलं त्यावेळीं त्याच्या पोटांत आगीचा भडका उडाला. तेव्हां ती आग विझवण्यासाठीं त्यानं ज्या वनस्पतीचं सेवन केलं तीच विजया. शेवटीं तिनंच विषावर जय मिळविला म्हणून शंकरांनीं तिचं नांव ठेवलं विषजया. पण पुढं म्हणणाऱ्यांचा बुद्धीभ्रंश होतां होतां त्या शब्दाचाही अपभ्रंश होऊन ती झाली विजया–उर्फ भांग–म्हणजे भंग करणारी. ह्याच वनस्पतीच्या साह्यानं शंकर प्रलयकालीं या जगताचा भंग करतात.

**अनंगा**—आतां तुम्हीं कुणाचा भंग करायला निघालांत ?

**भुजंग**—तुझ्या कोमेजलेल्या सौंदर्याचा. अनंगे, तुझे श्रम अगदीं व्यर्थ आहेत. हा भुजंग भारला जाण्याइतकी जादू तुझ्या सौंदर्यांत खास नाहीं. हवीतर या कुरंगासाठीं तुझी पुंगी वाटेल तेवढी वाजीव.

**कुरंग**—नकोरे बुवा, आधींच भांगेच्या सेवनानं माझं डोकं पायाच्या जागीं आणि पाय डोक्यांत गेले आहेत. मघापासून चालावं चालावं म्हणून ह्मणतों आहें पण पायच बेटे कुठं सांपडत नाहींत. पाहिलंस अनंगे, उजवा पाय मनांत आणावा तर डावा पाय पुढं जातो आणि डावा पहावा तर हातच पुढं येतो. पुढली पंचाईत तर याहूनही मोठी आहे. पाय ठेवायला कुठं तरी पाय ठेवला पाहिजे ना ? पण पाय ठेवायला जावं तर जमीनच कुठं सांपडत नाहीं. अफाट समुद्रांतील वादळांत सांपडलेल्या गलबतासारखी माझी स्थिती झाली आहे. चालतांना काय होतं पाहिलंस ? ( चालून दाखवितो )

**अनंगा०**—एकंदरींत आज तुमचीं पावलं सारखीं वांकडींच पडताहेत ह्मणायचीं !

**भुजंग**—भरपूर पाजला आज त्यानं. इतका घोटा साऱ्या जन्मांत मी कधीं घेतला नव्हता. शाबास चंद्रशेखर ! दाता असावा तर असा असावा. उदंड आयुष्य मिळो बिचाऱ्याला.

**अनंगा**—सेनापती साहेबांनीं तुह्मांला एवढा चळ लावला पण स्वतः मात्र अगदीं निश्चल राहिले आहेत.

**कुरंग०**—बरोबर बोललीस. त्याचं डोकं अगदीं लोखंडी आहे. तुझ्या-सारख्या शेंकडों अनंगा जरी समोर उभ्या केल्या तरी कांहीं तें वितळायचं नाहीं.

**भुजंग**—ठाऊक आहे लोखंडी डोकं! किती झालं तरी तो सदोदित मदिरा आणि मदिराक्षी घेऊन बसलेला! असा कांहीं शुकाचार्य नव्हे. लोखंडाला पुरेशी आंच मिळतांच तें वितळेलच वितळेल. अजून पावेतों तशी आंच देणारी कुणी भेटली नाहीं ह्मणून सारी बहादुरी!

**अनंगा**—मला कशाला सांगतां तें? आधीं तुमच्या त्या कादंबिनीलाच जा काय तो उपदेश करा.

**भुजंग**—अनंगा काय आणि कादंबिनी काय–एकाच झाडाचीं खोडं.

**कुरंग**—कांहींही ह्मणा, पण या चंद्रशेखराला डोलूं लावणारी भिल्लीण या जगतावर कुणी नाहीं, एवढं खरं.

**भुजंग**—वाटेल त्या गमजा दाखवूं दे. आज ना उद्यां पतन हें होणारच.

**कुरंग**—कुणाचं? चंद्रशेखराचं? अशक्य गोष्ट. निदान या जन्मीं तरी नाहीं.

**भुजंग**—अनंगे, या गाढवावर भरंवसा ठेवूं नकोस. या माझ्या गुलाबी डोळ्यांनीं मी हजारों पुरुष पाहिले आहेत. पण सदोदित बायकांत वावरणारा पुरुष–आज असो, उद्यां असो, परवा असो किंवा आणखी दहा दिवसांनीं असो, एका दिवशीं तरी प्रणयाच्या तडाख्यांत सांपडल्यावांचून राहाणारच नाहीं.

( कर्कोटक, कर्नाटक व नागरिक विष्णुदासाला मारीत घेऊन येतात. )

**नागरिक**—मारा ठार गुलामाला! ठार करा!

**भुजंग**—मेला–बेटा मेलाच ह्मणायचा. एका ह्मातार्‍याचीं हाडं ताणायला शंभरजण लागले आहेत! मेलाच तो. अरे ए बाबानों, जरा थांबा. सारखे काय ओरडतां! जरा दमानं घ्या. आतां या म्हातार्‍याला मार देणार तरी कोणत्या भागावर. मार द्यायच्या जेवढ्या म्हणून जागा आहेत तेवढ्या सर्व जागीं रट्टे तर हाणलेतच–अरे, ओरडतां काय लेकांनो? आधीं ऐकून तर घ्या. ( विष्णुदासाला ) अरे ए बाबा अस्थिशेखर, दाबतोस कशाला कंबर? एवढं मर्दन केलं या लोकांनीं तें पुरे नाहीं का झालं?

**कर्को०**—बोलूं नका त्याच्याबरोबर. तो आहे वैष्णव. फार दिवस चुकवित होता आह्माला–पण आज भला सांपडला! विष्णुमंदिराच्या जळालेल्या ढिगासमोर नमस्कार करीत होता बेटा. पकडला गप्पकन्! वारे माझे बुद्धी! शाबासरे कर्कोटक!

**भुजंग**—तूं पकडलंस याला ?

**कर्को०**—आहेंच मी तसा हुशार. आतां महाराजाकडे नेऊन याला उभा करतों. दोन हजार सुवर्णमुद्रा–अहाहा ! काय छन छन् वाजतील ! अहाहा ? काय आवाज—छन्नन्नन् छन्नन्नन्न् गंधर्वापेक्षांही गोड–चलरे सैताना !

**निवेदिता**—( प्रवेश करून ) काय हें ? काय हें ? तुम्ही काय माणसं आहांत कीं पिशाच्चं ? काय करतां आहांत हें ? तुम्ही आंधळे तर नाहीं ? दया, माया, धर्माची तुम्हांला ओळखच का नाहीं ? पशू देखील इतके निर्दय नसतात ! देवळं जाळलींत, घरं जाळलींत, बायका मारल्यात, लहान अर्भक सुद्धां कापून काढलींत—त्यानं सुद्धां तुमची अघोर तृपा मिटली नाहीं का ? या मगध देशांत पिकल्या केसांना खरोखरच कांहीं मान नाहीं का ? बाबा, बाबा, काय आपली दशा ही ? आपल्याला बांधायला कसे यांचे हात आले ?

**विष्णु०**—बांधूदेत. खुशाल बांधूदेत. या बंधनानं मला काडीभरही त्रास होत नाहीं.

**निवेदिता**—काय हें म्हणतां ? हें पहा, डोकीवरल्या खोकेंतून सारखं रक्त वाहातं आहे. जिथं तिथं हे काठ्यांचे वण ! मगधवासी लोकहो, तुम्हीं काय केलंत तें पहा. धिक्कार–धिक्कार असो तुम्हांला—आणि तुमच्या पौरुषे-याला ! अजूनही स्वस्थ उभे राहून पहात आहांत ? कांहीं लाज नाहीं वाटत तुम्हांला ?

**भुजंग०**—अरे ! ही कुठल्या अस्मानांतली बिजली ! आली कुठून एक-दम इथं ? जय माते शांभवी ! तुझ्या कृपेनें आज माझ्या गुलाबी डोळ्यांचं पारणं फिटलं.

**निवे०**—चला बाबा, मी तुम्हांला सांवरून घरीं नेतें. चला.

**कर्को०**—जातों म्हणतांच काय जातां येतं, बाई ? थांबा जरा. लोक हो, पाहतां काय ? एका गोंडस पोरटीच्या शब्दासरशीं असें स्तंभित काय झालांत ? गोऱ्या गोमट्या मुखचंद्रावरील काळ्या कुळकुळीत तारका चमकल्या म्हणजे तुम्ही दिपून जाणार कीं काय ?

**सर्वजण०**—नाहीं–नाहीं– मुळींच नाहीं !

**कर्को**—मग पहातां काय ? ही देखील वैष्णवीच दिसते. हिलाही बांधा.

**निवे**—बांधा–खुशाल मला बांधा आणि राजासमोर घेऊन चला. मग मला सिंहिणीच्या तोंडी द्या, मारा, कापा, वाटेल तर उभी जाळा–मी एक शब्दसुद्धां बोलणार नाहीं. पण या बिचाऱ्या वृद्ध महात्म्याचा कां छळ करितां ? यानं आजन्म कुणाचंही अनिष्ट केलं नाहीं. विपन्नाला सहाय्य, रोग्यांची सेवा, अनाथाचं परिपालन, दुःखितांचं सांत्वन हेंच ज्याचं व्रत, शत्रूचं देखील अकल्याण ज्यानं कधीं मनांत आणलं नाहीं, अशा महापुरुषाचा घात करायला तयार होतां–त्या तुम्हांला म्हणावं तरी काय ?

**भुजंग**—उग्रचंडाचे अनुचर !

**कर्नो**—वैष्णवाला मार देणं हा आमचा धर्म आहे. ( चंद्रशेखर व सुमंत प्रवेश करितात. )

**कर्को**—सरकार, हा वैष्णव आहे.

**चंद्र**—सुमंत, कोण बोलतो आहे, त्याचं तोंड आधीं बंद करा.

**कर्को**—मारूं नका, सरकार. माझा कांहीं अपराध नाहीं. क्षमा करा महाराज ! ( उठून ) मित्र हो, गडबड करूं नका. स्वस्थ रहा. तुमच्यासमोर कोण उभे आहेत–पाहिलंतना ? चंद्रशेखर महाराजांना मुजरा करा–अगदीं जमिनीपर्यंत लवून मुजरा करा.

**चंद्र०**—( स्वगत ) काय हें सौंदर्य ! मूर्तिमती स्वर्गीची अप्सरा ! ( उघड ) सुंदरी, तुझं नांव काय ?

**निवे०**—माझं नांव निवेदिता.

**चंद्र०**—( स्वगत ) किती तरी मधुर कंठस्वर ! ( उघड ) महाराज, आपलं नांव ?

**विष्णु०**—विष्णुदास.

**चंद्र०**—ही तरुणी आपली मुलगीच ना ?

**विष्णु०**—नाहीं, सरकार.

**चंद्र०**—कुणी नातलग तरी ?

**विष्णु०**—नाहीं, सरकार. हिचं माझं कसलंच नातं नाहीं.

**निवे०**---आपलं ह्मणायला या जगांत एका लहानग्या भावाखेरीज मला दुसरं कुणीही नाहीं.

**चंद्रशे०**---तर मग, ही तरुणी आपल्याबरोबर कां ?

**विष्णु०**---काय सांगूं-ही मूर्तिमती कारुण्यमूर्ती जर आज धांवून आली नसती, तर आज या रक्तपिपासू जनसंघाच्या जबड्यांतून या जीर्ण देहांतील एक हाड सुद्धां शिल्लक राहिलं नसतं. या निःशक्त बालिकेनं एकटीनं साऱ्या पिसाळलेल्या जनसमूहाला पिटाळून लावलं.

**चंद्र०**---काय ह्मणतां ? या अबलेनं तुह्मांला वाचविलं ? पतनोन्मुख देवदारू वृक्षाला कमलकुसुमानं सांवरलं ? खरोखर मोठं आश्चर्य आहे! सुंदरी, या वृद्धाचं आणि तुझं कसलंच नातं नाहीं ह्मणतेस ?

**निवे०**---हे माझे गुरु आहेत, महाराज.

**चंद्र०**---ह्मणजे ! तुह्मीं एकाद्या विद्यालयांतील अध्यापक आहांत का ?

**विष्णु०**---नाहीं सरकार, मी नुसतं शास्त्राध्ययन करतों.

**कर्नो०**---सरकार, तो वैष्णव आहे. ठार मारा त्याला.

**चंद्र०**---सुमंत, दूर कर या नराधमांना !

**भुजंग**---कुरंगा, पाहिलंस बाबा, चंद्रवदनाच्या किरणवर्षावाबरोबर नागरिक जनांचं तमःपटल एका क्षणांत दूर झालं.

**चंद्र०**---सुंदरी, केव्हांही सहाय्याची अपेक्षा असली तर हा चंद्रशेखर तुझ्या सेवेला तयार आहे असं समज.

**विष्णु०**---कपोतानं ससाण्याचं सहाय्य मिळविण्यासारखंच आहे हें !

**चंद्र०**---ही उपमा बुभुक्षित ससाण्याला शोभेल. पण ह्मातारेबुवा, मी ससाणा आहें असं खरंच तुह्मांला वाटतं का ?

**विष्णु०**---आपण राजा उग्रचंडाचे प्रतिनिधी आहांत.

**चंद्र**---बरं मग ?

**विष्णु०**---आपण या मगध देशांतील अत्यंत उच्च पदावर अधिष्टित अहांत. आपणाला विचारणारा कुणी नाहीं. स्त्री जाती म्हणजे आपल्या खेळांतली बाहुलीं आहेत. स्त्री जातीला प्राणापेक्षांही पवित्र वाटणारं पातिव्रत्य भ्रष्ट करायला आपणाला तिळमात्र संकोच वाटत नसतो. असली भयंकर महा-

पापं आपल्या हातून सहज लीलेनं हरहमेश घडत असतात. निवेदिता कुमारी आहे. आजन्म ब्रह्मचर्य पाळण्याची तिनं दीक्षां घेतली आहे. आधींच स्त्री जात, त्यांतून असलं कडक व्रत घेतलेलं, अशा परिस्थितींत—सहाय्य मागण्यासाठीं कां होईना—तिनं कुणाही पुरुषाची गांठ घेणं उचित नाहीं.

चंद्र—ही तरुणी पवित्र आहे असं तुम्हीं शपथेवर सांगाल ?

विष्णु०—वाटेल त्या रीतीनं सांगेन.

चंद्र०—या कलुषित मगध देशांत स्त्रियांचं पावित्र्य म्हणजे आकाश-कुसुमाइतकं दुर्मिळ आहे !—दुर्मिळ आहे, म्हणूनच तें कुठं तरी असावं अशी इच्छा सहज उत्पन्न होते.

विष्णु०—सरकार, राजसेवकाच्या हातून आमची सुटका करवून आपण महत् पुण्य संपादन केलं आहे, तेवढं तरी कलंकित करूं नका. कृपा करून आह्मांला जाऊं द्या—ईश्वर तुमच्या उदार मनोवृत्ती जागृत करो.

चंद्र०—भिऊं नका. मी तुमचा मित्र आहें असं समजा आणि खुशाल आपल्या घरीं जा.

विष्णु०—ईश्वर तुमचं कल्याण करो. पण महाराज, आपलं वचन—

चंद्र०—अजूनही संशय ? आतांपर्यंतच्या माझ्या वर्तनांत तुमच्या संशयाचं निराकरण होण्याजोगं कांहींच का नाहीं ? जा—आतां वेळ गमावूं नका—( तीं जातात. ) सुमंत, या दोघांच्या मागोमाग जा आणि यांचा ठावठिकाणा पूर्ण समजून घ्या.

सुमंत—जशी आज्ञा. (जातो)

चंद्र०—किती सुंदर लावण्यमयी देहलता तरी ! आधींच अलौकिक सौंदर्य-संपन्न, त्यांतून नुकत्याच उमलणाऱ्या यौवनाच्या सहज शोभेनं हिची देह-ज्योती शंभरपटींनं प्रकाशमान झाली आहे. एकाकी आहे. असहाय आहे—आणि या कठोरहृदयी मगधवासीयांची तिच्यावर करडी नजर आहे. काय होणार हिचं ? मी पुष्कळ सुंदरी पाहिल्या—त्यांच्या रूपमोहानं मी क्षणभर दिपूनही जात होतों पण आज या सुंदरीच्या दर्शनानं माझी काय स्थिती झाली आहे हें माझं मलाच कळत नाहीं. करुणेचं हें मूर्त स्वरूपच जणूं काय इथं अवतीर्ण झालं आहे.

अनंगा०—अहो चंद्रशेखर !

**चंद्र०**—कोण, अनंगा ? आणि हे कोण ? भुजंग, कुरंग. तुह्मी केव्हांपासून इथं आहांत ?

**भुजंग**—हं-हं-बाबा धर्मकथा बोल. बर्फासारखं स्वच्छ, लोण्यासारखं मऊ, स्फटिकासारखं निर्मळ, असं तें मांसखंड तुला कसं काय आवडलं ?

**चंद्र०**—काय बोललोस वेड्यासारखं !

**भुजंग**—साडेतीन हाताचीं तीन माणसं. त्यांतून एक तर तरुणी. एवढीं न दिसण्याजोगं, असलं हें साडेतीन हात चवथं मांसखंड, मोठं जबर खरं !

**चंद्र०**—काय ह्मटलंस, अनंगे, माझ्याकडे कांहीं काम आहे वाटतं ?

**अनंगा**—एकदां ह्मटलं गरिबाच्या घरीं आपली पायधूळ लागावी.

**चंद्र०**—माफ कर. मला फार जरुरीचं काम आहे; गेलंच पाहिजे.

**अनंगा**—भ्यालांत वाटतं ?

**चंद्र०**—कुणाला ?

**अनंगा**—कादंबिनीच्या वाग्बाणांना.

**चंद्र०**—कादंबिनीच्या वाग्बाणांची काय किंवा अनंगेच्या पंचबाणांची काय—मला मुळींच पर्वा नाहीं. कादंबिनीला मी कां भ्यावं ? काय वेडी समजूत !

**कुरंग**—कां भिऊं नये ? कादंबिनीचं नांव चंद्रशेखराच्या नांवाशीं साऱ्या मगध देशानं केव्हांच जखडून टाकलं आहे.

**अनंगा**—हो खरंच, तुमचं लग्न दिखील ठरलं म्हणतात !

**चंद्र०**—खरंच ? मगध देशाच्या लोकांनीं मला फारच मोठा मान दिला म्हणायचा !

**भुजंग**—पण सावध रहा बाबा. राजकारणाप्रमाणंच प्रेमविषयांत देखील शार्दूल तुझा भयंकर वैरी आहे, हें विसरूं नकोस.

**चंद्र०**—शार्दूलाला मी भ्याव ! शार्दूल म्हणजे माझ्या पायाखालचं कुत्रं आहे.

**अनंगा**—हो, लोकं असं देखील म्हणतात, कीं शार्दूल जिथं तिथं तुमचा पाणउतारा करूं पहात असतो. तशीच कादंबिनी देखील कांहीं अशी तशी बायको नाहीं. आधींच रूपवती, त्यांतून धनवती, असंही असून वर बुद्धिमती पण आहे.

भुजंग—काय होईल तें जाईल. चंद्रशेखर, एकदां लग्न करून एक बायको घरीं आण बाबा.

चंद्र०—कशाला बरं ?

भुजंग—कशाला ? म्हणतोस काय ? कशाला ? हः हः हः लग्न कर म्हणून म्हटलं, यांत विशेष काय झालं ? लोक कां लग्न करतात ?

चंद्र०—खरंच, कां लग्न करतात ?

भुजंग —एकादी बायको म्हणून घरांत पाहिजेच. गृहस्थाचं तें कर्तव्य आहे

चंद्र०—कुठलं कर्तव्य ? लग्न करणं, कीं एकादी बायको घरांत आणणं ?

अनंगा—दोन्हीही बरं–दोन्हीही. मी म्हणतें, लग्न कराच तुम्हीं एकदां.

चंद्र०—कधींही नाहीं. हा चंद्रशेखर केव्हांही विवाह करणार नाहीं. माझ्या हातून अनेक चुका घडल्या असतील पण ही चूक कालत्रयीं होणार नाहीं. हीच माझी प्रातिज्ञा.

कुरंग—ठीक आहे. पाहूं आतां कादंबिनीचा पराक्रम.

अनंगा—तिनं या प्रतिज्ञेवर पाणी घातलंच म्हणून समजा. जातें मी आतां. ( जाते )

चंद्र०—अहो कुरंग, भुजंग, उद्यां सायंकाळचें जेवणाचं निमंत्रण देऊन ठेवतों बरं. नाहींतर विसराल.

कुरंग—अलबत्–अलबत् येऊं.

भुजंग—अर्थात् येऊंच. पण ,एवढे पाय मात्र उद्यांपर्यंत ताब्यांत राहिले पाहिजेत ! ( दोघे जातात. )

चंद्र०—लग्न ? छेः छेः मी केव्हांही लग्न करणार नाहीं. आकाशस्थ देवतांनों, मला साक्षी व्हा. प्राणांतीही मी लग्न करणार नाहीं. पण ही सुंदरी ! तिचं तें मधुर भाषण, मोहक नेत्रविक्षेप, कांहीं केल्या मनांतून जातच नाहींत. जशी कांहीं अजून समोर उभी आहे. काय आश्चर्य आहे ! या घाणेरड्या वैष्णव वंशाच्या उकिरड्यांत असलं रत्न कसं उत्पन्न झालं ? ( सुमंत येतो ) काय सुमंत, लागला पत्ता ?

सुमंत—नगराच्या एका टोंकाला एका झोपडींत राहातात.

चंद्र०—तिथं आणखी कोण दिसलं तुला ?

**सुमंत**—नगरपाल शार्दूलाची त्या घरावर नजर आहे.

**चंद्र०**—अगदीं उघड.

**सुमंत**—नाहीं महाराज, त्या घरांत वैष्णव रहातात असा सुगावा लागल्या-वरून त्या घरावर शार्दूलानें गुपाचिप पहारा ठेवला आहे.

**चंद्र०**—शार्दूलाचा पहारा ! तर मग त्या बिचाऱ्या वैष्णवांची आतां धडगत नाहीं. जा सुमंत, तूंही त्या गुप्त हेरांत मिसळ. शक्य तेवढी सर्व बातमी गोळा कर आणि वेळोवेळीं मला कळवित जा.

**सुमंत**—जशी आज्ञा. ( जातो. )

**चंद्र०**—शार्दूल म्हणजे खराखुरा वाघ. त्याच्या जबड्यांतून या भोळ्या हरिणीला कशी सोडवूं ? खरं प्रमाण न मिळाल्यास तो खोटीं प्रमाणं तयार करील. पण त्या बिचारीला प्राणाला मुकायला लावील. काय करूं ? काय होईल तें होवो. या अनाथ अबलेसाठीं विपत्तिसागरांत उडी घेतलीच पाहिजे. काय माझी स्थिती झाली ही ! मी स्त्री समाजांत मिसळतों खरा पण त्यांचा हाडवैरी म्हणून पण त्यांच्या विषयींचा द्वेष या सुंदरीच्या दर्शनांत आज मावळूं लागला आहे. किती गोड नांव ! निवेदिता ! अहाहा ! निवेदिता. तो अमृतमय कंठस्वर दूर प्रदेशांतील संगीतलहरींप्रमाणं अजूनही माझ्या कानांत नाचतो आहे. हें आक-र्षण तरी कसलं ? तिच्या अंगावर सोन्याचा एक फुटका मणीसुद्धां नव्हता. नेसायला एक भिकार वस्त्र ! मग हें सौंदर्य कुठून आलं ? दागदागिन्यांनीं सजलेल्या एकाद्या तरुणीला पाहून मन क्षणभर मुग्ध होतं पण तिथं कसला तरी एक अभाव जाणवत असतो आणि म्हणूनच दुसऱ्याक्षणीं त्यांना पाहूं नयेसं वाटतं. पण ही ?—अहाहा ! हें सौंदर्य आलं कुठून ? मला वाटत असे, स्त्रिया तेवढ्या साऱ्या अपवित्र. पण आतां तें माझं मत बदलणार का ? ही वैष्णवी, निवेदिता, माझं मत बदलायला कारणीभूत होणार का ? अहाहा ! निवेदिता —निवेदिता !—निवेदिते, या उग्रस्वरूप चंद्रशेखराची काय ही दशा केलीस ?

( जातो. )

*

## ( प्रवेश ३ रा )

( आसनस्थ कादंबिनी व चित्रा. )

**कादंबिनी**—काय ग, चंद्रशेखरांना सांगितलास का निरोप ?

**चित्रा**—निरोप सांगितला. पण ते फार घाईत होते. मी उभी होतें-तोंच त्या पलीकडल्या चौकांत कसलीशी मारामारी चालली होती, तिकडे ते धांवत गेले.

**कादं०**—माझा निरोप ऐकून ते काय म्हणाले ?

**चित्रा**—म्हणणार काय ? हा आलोंच पहा, एवढंच म्हणाले ?

**कादंबिनी**—त्यावेळीं त्यांची मुद्रा कशी काय होती ?

**चित्रा**—निरोप सांगण्यापूर्वी ते फार गंभीर दिसत होते. पण आपला निरोप ऐकतांच गालांतल्या गालांत उगीच थोडेसे हंसले. खरंच, बाईसाहेब, अगदीं खरोखर. असं काय पहातां माझ्याकडे ? अगदीं खरोखर, हळूच हंसले !

**कादं०**—चल. फसवी कुठली ! तूं कांहींतरी सांगावंस आणि मी हुरळून जावं, अशीच कीं नाहीं तुझी इच्छा ?

**चित्रा**—मी कांहींतरी कां सांगेन ? हे पहा ते आलेच. ( चंद्रशेखर येतो. )

**कादं०**—यावं प्रतिनिधी महाराज, यावं. आपलं कुशल आहे ना ? आज काय नवी खबर आहे ?

**चंद्र०**—खबर काय असायची ? आमची कादंबिनी देवी कादंबिनीच आहे, एवढीच खबर !

**कादं०**—ही माझी स्तुती झाली वाटतं ?

**चंद्र०**—वाः ! यापेक्षां स्तुती ती आणखी काय करायची ? सूर्याला सूर्याचीच उपमा देण्यापेक्षां सूर्यप्रकाशाची आणखी स्तुती ती काय करायची ! कसं चित्रे, असंच कीं नाहीं ?

**चित्रा**—मला काय समजायचं आहे त्यांत ! आम्हीं आपलीं साधींभोळीं माणसं ! मोठ्या माणसांच्या सहवासानं आम्हांला मोठेपण आलेलं ! आम्हीं हीं भाषणं ऐकून सांठवून ठेवायचीं आणि बाहेर आमच्या तोलाच्या माणसांत वापरून पाहायचीं; तेव्हां कुठं लोक आम्हांला मोठेपणा देतात.

**कादं०**—उगी रहा ग. प्रतिनिधी महाराज, आमचा एकादा शब्द ऐकाल का ?

**चंद्र०**—हें काय विचारतां ? तुमचा शब्द आह्मांला आज्ञेसारखा वाटत असतो.

**कादं०**—मग आतां संध्याकाळच्या उपहाराला इथंच राहण्याची कृपा होईल का ?

**चंद्र०**—मोठं संकटच आलं हें ! आज मला तुमचा मनोभंग करायची पाळी आली आहे ! काय करावं—? आज फारच महत्वाचं काम असल्यामुळं—

**कादं०**—समजलं—समजलं ! मला कळतात हीं राजकारणं आणि महत्वाचीं कामं—

**चंद्र०**—ओहो ! मनोभंगाच्या पातकामुळं मला हा सुंदरसा भ्रूभंग पहायला मिळाला.

**भुजंग**—( प्रवेश करून ) भांग ? भांगेचं काय आहे ?

**चित्रा** –भंगट कुठले ? भांगेशिवाय दिसतं आहे का कांहीं दुसरं ?

**भुजंग**—भांगा शिवाय म्हण–बाई—भांगाशिवाय म्हण. अहाहा ! हा वांकडा भांग ! खेंचलेल्या मनुष्याच्या प्रत्यंचेसारखा दिसतो आहे. आणि हे बाजूचे फुगे प्रत्यंचेवर योजलेल्या बाणाच्या पिसाऱ्यांसारखे दिसत आहेत. नाकाच्या शेंड्याचं केंद्र साधून काढलेला भांग अगदींच बेढब. कारण त्याची गती अगदीं सरळ ! म्हणून खेंचलेल्या धनुष्याची दोरी आणि प्रत्यंचा यांच्या प्रमाणांत जसं विषमत्व असतं, तसंच विषमत्व या मस्तक—धनुष्य—रेषेंत नसलं तर शरसंधानाचं कार्य कसं होणार ? सरळपणा नको आहे. वांकडं तेवढंच हल्लीं आम्हांला आवडतं.

**चंद्र०**— भुजंग, अगदींच बहकलास ! पंचबाणाच्या शरसंधानाचं कार्य भ्रूभंगानं व्हायचं असतं. भांगाचा तिथं काय संबंध ?

**भुजंग**—बाबा, ते दिवस आतां बदलले आहेत. भांग—भांग आणि भांग—दुसरा शब्द बोलूं नकोस. वारंवार भ्रूभंगाची संवय झाल्यानं बायकांना आपण निराळ्या होत चाललों आहोंत असं वाटूं लागलं, म्हणून त्यांनीं ही नवीन कल्पती काढली आहे. वांकडा भांग काढलेला असल्यामुळं सहज मान वळवली कीं भांगाच्या भंगानं आपोआपच भ्रूभंग झाल्यासारखा दिसतो. आणि

एवढयासाठींच मी ही भांग पकडली आहे. बायकांना भांग आवडला कारण तो पुल्लिंगी, अर्थात मी भांग पकडली कारण ती स्त्री जात. आतां समजलं ?

कादं०—अगदींच चळ लागत चाललं तुम्हांला ! पण तसं तरी कसं म्हणावं ? चळापेक्षां यांत लबाडीचाच अंश जास्त आहे. आपल्या भांगेच्या आवडीचं समर्थन करण्यासाठीं आमच्या भांगाचे हे सारे घिंडवडे करतां आहांत झालं !

भुजंग—घिंडवडे ! देवी, हें काव्य आहे बरं काव्य ! मी भांग पितों म्हणूनच भांगावर हें सुंदर काव्य करतां आलं. दुसऱ्याला नाहीं हें साधायचं ! अहाहा ! भांग ! भांग काय करील ? भांग काय न करील !

चंद्र—तुझ्या हृदयांत प्रेमाचा उद्रेक !

भुजंग—प्रेमाच्या उद्रेकाचा भांगेनें भंग व्हायचा. ही विजया आहे—विषजया आहे—बाबा—विषजया आहे. प्रेम—विषावर जय मिळवायचा असला तर बेट्या, भांगच प्यावी लागणार. चंद्रशेखर, ऐक माझं. तूं थोडी थोडी भांग घेत जा. म्हणजे तुझ्या हातनं आजच्या सारखं पाप घडणार नाहीं.

चंद्र—पाप ? प्रेम म्हणजे पाप का ?

कादं०—भांगावरनं नि भांगेवरनं एकदम प्रेम कुठनं आलं हें ? प्रेम म्हणे ! चंद्रशेखर, तुम्हांला प्रेमाची नुसती ओळख तरी आहे, असं वाटतं का ?

चंद्र०—आहे. पूर्ण ओळख आहे.

कादं०—चंद्रशेखर, तुम्हांला हृदय तरी आहे का ?

भुजंग—हृदय ? देवी, तें मला विचार. असल्या दगडी पुतळ्याचं हृदय देखील दगडी आहे, असं आजपर्यंत मला वाटत असे. पण दोन घटकांपूर्वी माझे डोळे जरी भांगेनं तारवटलेले होते तरीही उघडले. या गुंळगुळीत घोटीव संगमरवरी दगडाखालीं अगदीं मऊ मिळमिळीत लोण्यासारखं हृदय आहे. अहाहा ! ते डोळे ! नाहीं चंद्रशेखर ? यंवू ! ते टुकटुकित डोळे आणि तो गुळगुळित चेहरा ! वाः ! तें लांडग्या कोल्ह्यासारखं अघाशी सैन्य नुसता तो चेहेरा दिसल्याबरोबर एकदम बिचकून पळून गेलं.

कादं०—कुणाचे डोळे नी कुठलं सैन्य ? भुजंग, ही कुठली हकीकत आहे ?

भुजंग—अजून नाहीं कळली ! किती सरळ बोलत होतों मी ! तरी देखील नाहीं कळली ! बरं, आतां काय कळलं नाहीं, तेवढंच सांगा पाहूं. पहा, एक गोरीगामटी कपाळकरंट्या वैष्णवांची पोरटी—अहाहा ! ते डोळे ! अहाहा, ते डोळे ! हे चंद्रशेखर तिथं आले म्हणूनच जगली बेटी. नाहींतर ठार मेलीच होती बिचारी ! काय तो मुखडा ! छेः ती एक सुंदरी आहे खरी !

कादं०—वैष्णवी ! आणि सुंदरी ! चंद्रशेखर, काय असंबद्ध बोलताहेत हें ?

चंद्र०—सारी दिवसरात्र भांग चढवलेली असते—त्याचं माथं कुठं ठिकाणावर आहे ? काय तोंडाला येतं आहे तें बरळतो आहे झालं !

भुजंग—खरंच. आतां भंगट कोण ? तूं कीं मी ? माझं माथं ठिकाणावर नाहीं हें ठरलंच. पण तुझं माथं ठिकाणावर आहे कीं नाहीं ते जरा हालवून डोलवून पहा बरं ! आला—आला—माझा पाठीराखा आला—हा पहा कुरंग आला. आतां मी भीत नाहीं.

कुरंग—( प्रवेश करून ) हें काय भुजंग—पीतां पीतां मधेंच निघून आलास इकडे ?

भुजंग—थोडा रुचिपालट करावा म्हणून झुकलों जरासा—तों इकडे अचानक कादंबिनी देवीच्या प्रासादांत येऊन पडलों. अगदीं नकळत येऊन पडलों बरं ! बरं, पण कुरंगा, आतां तूं माझी अब्रु राख. मघाशीं चंद्रवदनाच्या प्रकाशानं त्या पोरटीनं त्या चोरांना कसं पिटाळून लावलं तें सांग पाहूं.

कुरंग—चोरच ते ! चांदण्याला म्याले !

कादं०—कुणाचं चंद्रवदन, कुरंग ? कुणा वैष्णवीचं का ?

भुजंग—पकडलं—पकडलं—ठीक पकडलं !

चंद्र०—भुजंग, हा फाजिलपणा पुरे झाला नाहीं का ?

भुजंग—फाजिलपणाच्या नदींत या कुरंगानं भांग पाडला, नाहीं तर पाहिली असतीस गंमत.

चंद्र०—पुरे झाली ही भांग ! भांग पिणं पतकरेल पण भांग होणं कांहीं चांगलं नव्हे. कुरंग, आपल्या दोस्ताला सांभाळून घरीं घेऊन जा पाहूं.

कुरंग—चल भुजंग, आतां घरीं जाऊं .

भुजंग—तूं ! बेट्या, तूं मला घरीं नेणार ? अरे मूर्खा, मी जसा भांगेनं भंग पावलों आहे तसाच अनंगेनं तुला नंगा केला आहे. दोघांचीही स्थिति खरं पाहूं गेल्यास एकच. पण आधीं असं सांग, तूं सडकून भांग प्यायला आहेस का ?

कुरंग—नाहीं—मी मुळींच भांग प्यायलों नाहीं.

भुजंग—गाढवा, तूं जर भांग प्यायला नाहींस तर मला तूं घरीं नेणार कसा ? भंगट्याला सावरणाही भंगटच नसला तर काय माय व्याली आहे त्या सावरणाराची त्याला सावरायला ! दोघांचेही पाय एकाच तालांत पडले पाहि-जेत. दोघांनीही एका तालांत कोलमडावं, धडपडावं, पडावं, उठावं, पुन्हां गडबडावं, असं चालल्या खेरीज मुक्काम कसा गांठणार ?

कुरंग—चल—चल—इथं जास्त गडबड करूं नकोस.

भुजंग—गडबड ? अहाहा ! गडबड तर तीच गडबड ! मघांची वैष्णवांची गडबड ! अहाहा ! ती गोंडस पोरटी ! पुन्हां एकदां तरी पाहिलीच पाहिजे—एकदां तरी पाहिलीच पाहिजे ! ऐकलं ? देवी कादंबिनी, त्या वैष्णवाच्या पोर-टीला आपण एकदां डोळे भरून पाहून घेणार. ( चंद्रशेखर भुजंगला घेऊन जाण्याविषयीं कुरंगला डोळ्यांनें खूण करतो. )

कुरंग—पुन्हा लागलास बोलायला ? तोंड मिट पाहूं.

भुजंग—तोंड मिटूं ? कसं असं ? ( तोंड उघडतो. ) अहाहा ! ती वैष्णवी— ( कुरंग त्याला ओढीत नेतो. )

कादं०—( चंद्रशेखरांस ) कां घालवून दिलंत त्याला ? त्याचं भय वाटलं ?

चंद्र०—भय कसलं ? भुजंगाच्या भांगेच्या तारेंतल्या भाषणांचं ?

कादं०—कुठल्या वैष्णवीबद्दल बोलत होता तो ?

चंद्र०—ती वैष्णवीच होती असं कांहीं खात्रीनं म्हणता येत नाहीं. एक म्हातारा आणि एक मुलगी रस्त्यांत शार्दूलाच्या सैनिकांच्या तावडींत सापडली होती. त्यांना माझ्या सैनिकांनीं त्यांच्या हातून सोडविलं, एवढंच. भुजंग त्यावेळीं तिथं होता पण त्याची भांगेची मात्रा पुरी चढली असल्यामुळं काय झालं तें त्याला मुळींच कळलं नसावं.

कादं०—पण भांगेच्या तारेंत माणूस बहुतकरून खऱ्या गोष्टीच उघडकीला आणीत असतो.

चंद्र०—असेल कदाचित्. पण खरं पाहूं गेल्यास आधीं चांगल्या शुद्धींत असतांना ती गोष्ट लपविण्याची इच्छा तरी असली पाहिजे. ( स्वगत ) निवेदिते, तूं वैष्णवी ऐस किंवा कुणीही ऐस, वाटेल तीं संकटं अंगावर आलीं तरीं तीं स्वतः सोसून आधीं तुझंच रक्षण करीन. कुणाच्याही अडथळ्याला या कामी मी केव्हांही जुमानणार नाहीं.

कादं०—कां ! बोलतां बोलतां मधेंच थांबलातसे ! ( शार्दूल येतो )

शार्दूल—अरे वाः ! चंद्रशेखर तर इथंच आहेत.

चंद्र०—कोण, शार्दूल ?

शार्दूल—देवी, मी अभिवादन करतों. ( चंद्रशेखर ) होय, प्रतिनिधी, एवढा वेळ मी आपल्याच शोधांत होतों. महाराजांनीं हा लेखी हुकूम आपल्याकडे पाठवला आहे.

चंद्र०—हुकूम फार जरूरीचा आहे का ?

शार्दूल—अतिशयच जरूरीचं आहे.

चंद्र०—देवी, मला थोडा वेळ क्षमा कर. ( वाचूं लागतो. )

कादं०—काय हो शार्दूल, तुमचा हुकूम पाहून प्रतिनिधी बरेच भांबावल्यासारखे दिसताहेत.

शार्दूल—भांबावण्याजोगं त्यांत कांहीं आहे असं निदान मला तरी वाटत नाहीं.

कादं०—त्या हुकूमांत काय आहे ते तुम्हांला माहीत आहे वाटतं ?

शार्दूल—विशेष महत्वांचं असं त्यांत कांहीं सुद्धां नाहीं. वैष्णव लोकांनीं गुप्त कट करून महाराजांचा घात करावा, असा बेत केल्याचं महाराजांना कळलं आहे. म्हणून महाराजांनीं असा हुकूम केला आहे, कीं वैष्णव अगर वैष्णवांच्या संगतींत भजन पूजन करणारे अगर त्यांच्या कोणत्याही कार्यांत त्यांना मदत करणारे अगर केवळ वैष्णवांचा सहवास करणारे, या सर्वांचे सरसहा हालहाल करून प्राण घ्यावे.

कादं०—काय ह्मणतां ? हालहाल करून प्राण घ्यायचा ?

चंद्र०—शार्दूल, महाराजांना प्रणामपूर्वक कळवा, कीं दिलेला हुकूम मला शिरोधार्य आहे.

शार्दूल—अगदीं हुकमाची तामिली करायलाच निघालांत वाटतं ?

चंद्र०—हा प्रश्न विचारायची कांहीं जरुरी नव्हती !

शार्दूल—देवी, आज एका अतिथीची भोजनाची सोय होईल का !

कादं०—मोठया आनंदानं होईल बरं. आज पंक्तीला कुणी अतिथी असावा अशी माझी फार इच्छा होतीच. पण चंद्रशेखर पूर्वीपासूनच जेवायला नाखूष होते—आणि आतां तर जरूरीचा हुकूम मिळालेला. बरं झालं तुम्ही आलांत ते ! काय म्हटलंत ? वैष्णवांना हालहाल करून मारायचं ! फार सुंदर हुकूम ! अगदीं योग्य वेळीं, अगदीं योग्य हुकूम, अगदीं योग्य माणसाच्याच हातीं आला ! फार उत्तम झालं ! चला, भोजनाची वेळ टळूनच गेली आहे. पण कसं बसं आपलं थंड ऊन असेल तसं गोड करून घ्या. ( चंद्रशेखराखेरीज सर्व जातात. )

चंद्र०—( वाचूं लागतो. ) 'बाल, वृद्ध, स्त्रिया, आजारी किंवा दुःखी असा विचार मनांत न आणतां सरसहा सर्वांचा शिरच्छेद करा. शिरच्छेद करण्यापूर्वी प्रत्येकाचे शक्य तेवढे हाल करा, असा आमचा तुम्हांला हुकूम आहे. तो तुम्ही अक्षरशः पाळाल अशी आम्हाला खात्री आहे.' भयंकर ! किती भयंकर हुकूम आहे हा ! आजपर्यंत असे हजारों हुकूम निःसंकोच तामिल केले पण हाच हुकूम मला भयंकर कां वाटावा बरं ! कांहीं असो, राजाज्ञा तर मान्य केलीच पाहिजे. हाल हाल करून वैष्णवांची कत्तल करायची ! आणि ती सरळ स्वभावाची तरुणी निवेदिता—ती वैष्णव आहे का ? प्रसंग मोठा कठीण आहे यांत शंका नाहीं.

( पडदा पडतो )

# अंक दुसरा



## प्रवेश पहिला

( विष्णुदास, माधवदास, निर्माल्य )

**विष्णु०**—रस्त्यावर चंद्रशेखरांचें निवेदितेशीं कांहीं संभाषण झालं का ?

**निर्माल्य**—विशेष कांहीं झालं नाहीं.

**विष्णु०**—आतां तूं सांगितलंस, एवढंच ना ?

**निर्माल्य**—होय एवढंच.

**विष्णु०**—शार्दूल किंवा त्याचे हेर यापैकीं कुणी तुला पाहिलं नाहीं ना ?

**निर्माल्य**—त्यानंतर मला कुणीच आढळला नाहीं.

**विष्णु०**—निर्माल्य, तूं वयानं जरी लहान आहेस तरी साधुजनांच्या सह-वासानं तुझं ज्ञान विकास पावलं आहे. बरं काय आणि वाईट काय हें कळण्याची पात्रता तुझ्या अंगीं आली आहे, असं मला खास वाटतं. अगदीं बालपणापासून मी तुझं संगोपन केलं आहे, भगवद्भक्तीनें तुझं मन पूर्ण भरलेलें आहे, ईश्वराच्या आशीर्वादासारखा तूं पवित्र आहेस—तसंच दारिद्र्यांत वाढलेला असल्यामुळं कष्ट सहन करण्याची शक्ति तुझ्या अंगीं आली आहे. बाळा, तुला काय सांगूं ! कठोर परीक्षेची वेळ अगदीं जवळ आली आहे. तुझ्या बहिणी-वर कोणत्या प्रकारचं संकट येऊं पहातं आहे, याची तुला कल्पना आली आहे का ?

**निर्माल्य**—आपल्यावर तरी कुठं कमी संकटं येताहेत ?

**विष्णु०**—माझ्यावरील संकट आणि निवेदितेवरील संकट, यांच्यांत फार भेद आहे. वैष्णव म्हणून आम्हीं पकडले गेलों तर फक्त मरावंच लागेल; आणि मरणाला आम्हीं केव्हांही तयार आहोंत. पण निवेदितेच्या संकटाची कल्पना होताच अंगावर शहारे येतात ! चंद्रशेखराची पापी दृष्टी तिच्यावर पडली आहे. चंद्रशेखर प्रतापशाली आहे, त्याला विचारणारा दुसरा कुणीही नाहीं. त्याच्या लालसारूपी अग्नींत निवेदितेची आहुती न पडो म्हणजे झालं !

**निर्माल्य**—आतां मी काय केलं पाहिजे ?

विष्णु०—निवेदिता वैष्णवी आहे, असं चंद्रशेखराला कळलं नाहीं, तरी त्याला तसा संशय येणें संभवनीय आहे. निवेदितेबरोबर त्यानं आतां तुला पाहिलं आहे. कदाचित् कुणी तुलाही पकडतील. तूं अजून पोर आहेस, तुला कांहींतरी यातना दिल्या तरी तुझ्याकडून बातमी काढतां येईल, या आशेनं कुणी तसंही करायला चुकणार नाहींत.

निर्माल्य—बाबा, आपण निर्धास्त असा. मला पकडून त्यांनीं वाटेल त्या यातना दिल्या, तरी कुडींत प्राण असे तों माझ्या तोंडून एक शब्दही बाहेर फुटणार नाहीं.

विष्णु—भगवान् श्रीकृष्णाचं वाक्य तुझ्या ध्यानांत आहे ना ? मनुष्याचा देह म्हणजे एक जीर्ण वस्त्र होय. या फाटक्या कपड्यावर ममता धरणं, वैष्णवाला अनुचित होय.

निर्माल्य—आपणच मला सांगत आलां आहांत, कीं देह, मन, गणगोत, वैष्णव ' स्वतःचं ' मानित नाहींत. तनु, मन, धन, सर्व कांहीं भगवान् श्रीकृष्णाचं, अशीच वैष्णवांची भावना असते. मग त्याचाच असलेला देह त्याच्याच इच्छेनं जर पडला, तर त्यांत दुःख कसलं !

विष्णु—शाबास बाळा ! अशीच भावना निश्चल ठेव. तुझं नांव निर्माल्य आहे–भगवंताच्या पादपद्मावर अर्पण केलेल्या पुष्पांजलीप्रमाणं तूं मलहीन आहेस. जा आतां. सांगितलेलं काम पुरं करून ये.

निर्माल्य—तर मग ताईला बरोबर घेऊन मी महावनाकडे निघतों. दोनप्रहर रात्रीच्या पूर्वी तिथं पोंचलं पाहिजे.

विष्णु०—जा. पण घराबाहेर पडतांना फार सावधगिरी ठेव–सरळ रस्त्यानं जाऊं नकोस. शक्य तितका गल्लींतील रस्ता पकड. आतां महावनांतून या पाटली-पुत्रांत पुनः फिरायचं नाहीं, असा मी दृढसंकल्प केला आहे. तिथनंच आपण वृंदावनाचा मार्ग धरूं. श्रीची मूर्ती घेऊन आम्हीं तिकडेच येतों. तुझी आमची पुनः इथं गांठ पडणार नाहीं.

निर्माल्य—येतों तर—( नमस्कार करतो. )

विष्णु०—दीर्घायू हो बाळा ! भगवान् श्रीकृष्ण तुझा मार्गदर्शक होवो. ( निर्माल्य जातो. )

**माधव०**—या मुलाचं भाषण ऐकलं, कीं भगवंताची अजूनही आपल्यावर पूर्ण कृपा आहे, असं वाटतं. मुलगा लहान खरा, पण त्याची श्रद्धा किती मोठी !

**विष्णु०**—माधवदास, तुम्हीं आतां उशीर लावूं नका. महंत महाराजांना सर्व हकीकत कळवून महावनांत जाण्याची तयारी करा. आतां हा देश सोडल्या-खेरीज गत्यंत नाहीं, असं मी पूर्ण विचारांतीं ठरवलं आहे. निवेदितेमुळं मला आज अधिकच काळजी वाटूं लागली आहे. उग्रचंड जसा निर्दय आहे, तसाच चंद्रशेखरही आहे. दोघेही पुरे व्यसनाधीन आहेत. निवेदितेवर चंद्रशेखराची नजर गेली आहेच, आतां मनही जाणं असंभवनीय नाहीं. निर्माल्याच्या सांग-ण्यावरून असं वाटतं, कीं रस्त्यांत तिला भेटल्यावेळीं तो बराच चंचल झाला असला पाहिजे. म्हणून महंत महाराजांनाही तुम्ही आमच्याबरोबर वृंदावनाला येण्याचा आग्रह करा.

**माधव०**—असंच केलं पाहिजे. आज जें कांहीं मी ऐकलं किंवा पाहिलं, त्यावरून हा देश माणसांचा नसून पिशाच्च्यांचाच आहे, असं मला वाटूं लागलं आहे.

( निवेदिता घाबऱ्या घाबऱ्या येते. )

**विष्णु०**—हें काय ! निवेदिते, तूं निर्माल्याबरोबर गेली नाहींस !

**निवे०**—नाहीं, निर्माल्य मला कुठं आढळला नाहीं. तो लवकर आला नाहीं म्हणून त्यालाच शोधण्याकरतां मी इकडे आलें... पण बाबा, तुमच्या आज्ञेबाहेर वागल्यामुळं मी आज महत्संकटाला कारणीभूत झालें आहें; कुणी तरी माझा गुप्तपणानं पाठलाग करतो आहे.

**विष्णु०**—कोण ?

**निवे०**—कोण तो मी ओळखला नाहीं; पण मी घराबाहेर पडतांच कुणीतरी झाडाआडून बाहेर पडलेला मी पाहिला. त्याची नजर चुकवण्याची मी फार खटपट केली, पण त्यानं माझी पाठ सोडली नाहीं. समोर मला एक घर दिसलं, त्याच्या उघड्या दरवाजांतून मी आंत घुसलें आणि दरवाजाला कडी घातली. काळोख असल्यामुळं त्यानं मला आंत शिरतांना पाहिलं नाहीं, तो तसाच पुढं गेला. तो दृष्टीच्या आटोक्याबाहेर गेलासं पाहून मीही पळत इकडे आलें.

**विष्णु**—तूं इकडे आल्याचं त्यानं पाहिलं नसेलच !

निवे०—बहुतकरून नाहीं.

विष्णु०—पाहिलंत ना माधवदास ? वैष्णवांचा काय छळ चालला आहे ! बुद्ध हा नारायणाचा अवतार. हिंदू त्याला भगवंताचा नववा अवतार समजून त्याची पूजा करतात. पण कित्येक आत्मसेवापरायण दांभिक बौद्ध, शाक्तांशीं मिलाफ करून बौद्ध धर्माची एक नवीनच शाखा बनवते झाले आणि आपणाला बौद्ध कापालिक म्हणवूं लागले. अतएव, ना बौद्ध ना शाक्त हिंदू, असा हा निरीश्वरवादी पंथ या पुण्यभूमींत संचार करूं लागला. हे ईश्वर मानीत नाहींत, पुनर्जन्म मानीत नाहींत; शास्त्र, देव, ब्राह्मण, यांची त्यांना ओळख नाहीं; साधू असाधू यांचा विचार नाहीं; आत्मसुखासाठीं वाटेल त्याची सेवा करणारे हे सुरापानी लोक, हल्लीं दुबळ्यांना भंडावून सोडीत आहेत. ज्या भूमींत भगवंताचे एवढे अवतार झाले, त्याच भूमींत जन्म घेऊन हे कापालिक, सज्जनांचा जो छळ करताआहेत तो पाहून हृदयाला थरकांप सुटतो———(पडद्यांत कोण आहे आंत ?—दरवाजा उघडा—)कोण आहे ? ( पडद्यांत—कोण—आहे तें दरवाजा उघडून पहा—) तुम्हांला कोण पाहिजे ? (पडद्यांत—घरचे धनी पाहिजेत. ) कोण तुम्हीं ? तुमचं नांव काय ?

माधव०—हा आवाज तुमच्या ओळखीचा आहे का ?

निवे०—कांहीं सांगता येत नाहीं. . .पण. . .नाहींच ओळखीचा.

माधव०—मग ! उघडावं का दार ?

विष्णु०—निवेदिते, तूं जरा आंत जा पाहूं. ( दरवाजा उघडतो व वृद्धवेषी चंद्रशेखर प्रवेश करतो. )

विष्णु—कोण तुम्ही ?

चंद्र०—( माधवदासला उद्देशून ) हे कोण ?

विष्णु०—आमचेच मित्र आहेत.

चंद्र०—यांच्यासमोर बोलायला कांहीं हरकत नाहीं ना ?

विष्णु०—कांहीं हरकत नाहीं—पण आजोबा, तुम्ही कोण ?

चंद्र०—माझं नांव कुंभीलिक, मी पूर्वी मोळीविक्या होतों. पण आतां म्हातारपणामुळं माझ्या हातानं तें काम व्हावं तसं होत नाहीं. असाच भिक्षा मागून उदरनिर्वाह करतों.

**विष्णु०**—ठीक-इथं तुमचं काय काम आहे? तुम्हांला कांहीं मदत पाहिजे का!

**चंद्र०**—आज वैष्णव म्हणून तुम्हाला पकडलं होतं ना!

**विष्णु०**—असेल किंवा नसेल. तुम्हाला काय त्याचं?

**चंद्र०**—मला त्याचं कांहीं नाहीं, पण तुम्हाला मात्र फार महत्व आहे. तुम्ही खरोखरच वैष्णव आहांत का?

**विष्णु०**—असं विचारण्याचा तुम्हांला काय अधिकार आहे!

**चंद्र०**—अधिकार नाहीं खरा, पण तुमची कांहीं सेवा घडावी असं वाटलं, मी असा भिकारी आहें, तरी पूर्वीच्या धंद्यामुळें माझ्या मोठमोठ्या लोकांशीं ओळखी आहेत. ते सर्व लोक वैष्णवांचा द्वेष करतात—

**विष्णु०**—तें सर्व जगाला माहीत आहे.

**चंद्र०**—पण त्यांतल्या एक दोघांना वैष्णवांचा तितकासा तिटकारा वाटत नाहीं. ते केवळ कर्तव्यासाठीं राजाज्ञा पालन करतात.

**विष्णु०**—बरं आहे. मग?

**चंद्र०**—कित्येकांना या वैष्णवांची कींव येते. ईश्वर म्हणून एक नसताच बागुलबुवा त्यांनीं उत्पन्न केला आहे यमयातनेच्या खोट्या भयावर सुखसंभोगाला हे विरोध करतात, हे वैष्णव राजद्रोही आहेत, अशी कित्येकांनीं भलतीच हूल उठविली आहे—आणि राजाला ती पटली आहे.

**विष्णु०**—वैष्णव ईश्वरवादी आहेत खरे. ते राजद्रोही आहेत हें मात्र मला आतांच कळून आलं! कुंभीलक, ज्यांनीं ईश्वराच्या पायीं आत्मार्पण केलं आहे, त्यांना राजाचं ऐश्वर्य काय करायचं आहे? त्यांना नरहत्येंत सुख वाटत नाहीं. धर्मजीवनाच्या उद्बोधनांत त्यांना धन्यता वाटते. त्यांचा आनंद सुरापानांत नाहीं—भगवंताच्या नामसुधापानांत आहे. मगधेश्वर उग्रचंड कापालिक आहे. व्याभिचार आणि अत्याचार, हीं त्याची भूषणं आहेत. रक्तपात हा त्याचा आनंद आहे. त्याला वैष्णवांचं ह्द्गत् कसं कळेल?

**माधव०**—हं हं असे घसरूं नका.

**चंद्र०**—ज्ञातारिबुवा, तुमच्या साहसाचं मला आश्चर्य वाटतं! ज्यांच्या राज्यांत तुह्मीं वास करीत आहांत, त्यांची बेधडक निंदा करशी करतां! सांभाळा बरं, माझ्याजवळ काढलेले उद्गार दुसऱ्या कुणाजवळ तरी बोलून दाखवूं नका.

विष्णु०—एवढंच सांगण्यासाठीं तुह्मीं आला होतां का ?

चंद्र०—मी तुह्माला वेळींच सावध करतों आहे, मला आपला मित्र समजा. नगरपाल शार्दूलांनीं तुमचा नायनाट करण्याची प्रतिज्ञा केली आहे. निवेदिता नांवाची जी एक तरुणी तुमच्याबरोबर आहे, तिला पकडण्यासाठीं तो टपून बसला आहे. जर खरोखर तुह्मीं वैष्णव असाल तर त्या तरुणीच्या कल्याणासाठीं तरी तिचा त्याग करा. तुह्मीं वृध्द तुह्मांला जगणं किंवा मरणं दोन्ही आहांत, सारखींच आहेत; पण ती अजून तरुण आहे, संसारांतील सुखाचा अजून तिला उपभोग घ्यायचा आहे—

विष्णु०—संसारांतील सुखं ? सुख कशाला ह्मणतात तें तुह्मांला माहीत आहे का ?—निवेदिते, इकडे ये. ( निवेदिता येते. )

निवे०—काय बाबा ?

चंद्र०—( स्वगत ) अहाहा ! तीच ही सुंदरी !

विष्णु०—बाळे निवेदिते, हे ह्मातारेबुवा तुझा त्याग करण्याविषयीं मला सांगताहेत.

निवे०—कां बरं ?

विष्णु०—आमच्या बरोबर राहिल्यास तुला मरणाचं भय आहे; पण तूं अजून लहान असल्यामुळं संसारांतील सुखं चाखण्यासाठीं तुला अजून जिवंत राहणं अवश्य आहे, असं हे ह्मणत आहेत. बोल, तुला काय पाहिजे ? संसारसुखपूर्ण जीवन कीं मरण ?

निवे०—नश्वर संसारांतील सुखं मला नको आहेत बाबा. आपल्याला टाकून मी कुठं जाऊं ? आणि कां जाऊं ? साधुसेवेंत मृत्यू आला, तर तोच मला जगण्यापेक्षां जास्त आनंदप्रद वाटेल.

विष्णु०—हे म्हातारेबुवा ह्मणतात, कीं संसारांत सुखं फार आहेत.

निवे०—खरं सुख अजून त्यांनीं अनुभवलं नाहीं, ह्मणूनच ते असं ह्मणत असतील. ( दचकून ) बाबा, हेच माझा पाठलाग करीत होते.

विष्णु०—काय ? हे ? कुंभीलक, हें खरं का ?

निवे०—कुंभीलक ? कुठले कुंभीलक ? हे तर राजप्रतिनिधी चंद्रशेखर !

चंद्र०—सुंदरी, तुझ्या नेत्रांत जशी कोमलता आहे, तशीच प्रखरताही आहे! या वेषाची आतां काय जरुरी आहे ? ( दाढी फेकतो. उघड ) होय,

चंद्रशेखर तो मीच. कुंभीलक म्हणून कुणी व्यक्ती नसली, तरी चंद्रशेखर तुमचा मित्र आहे असं समजा. मगधेश्वराच्या आज्ञेनुरूप वैष्णवांचा समूळ नाश करणं मला अवश्य आहे. स्त्री, बाल, वृद्ध, हा भेद मला मानतां येणार नाहीं. तुम्ही वैष्णव असल्याचा पुरावा अजून माझ्या हातीं आला नाहीं खरा, पण आला कीं माझा नाइलाज होईल. हे कल्याणी, तुझ्या कल्याणासाठीं मी काय वाटेल तें करीन, पण राजाज्ञेचा भंग करणं मात्र मला अशक्य आहे. म्हणून पुनः एकवार सांगतों, कीं वेळींच सावध हो–( दरवाजा वाजतो. )

विष्णु०—कोण आहे ? ( पडद्यांत–मी तो वैष्णवचरण, लवकर दरवाजा उघडा ! ) ( दरवाजा उघडून वैष्णव. प्र. क. ) काय गडबड आहे ?

वैष्णव०—निर्माल्य पकडला गेला.

विष्णु०—पकडला गेला ?

वैष्णव०—होय, कैदी झाला !...हे कोण ?

चंद्र०—मी राजप्रतिनिधी चंद्रशेखर आहे.

वैष्णव०—प्रतिनिधी आणि इकडे ?

चंद्र०—हा निर्माल्य कोण ? सुंदरी, तुझ्याबरोबर थोड्यावेळापूर्वी मी ज्याला पाहिलं तोच का हा निर्माल्य ?

निवे०—होय, महाराज–तोच माझा भाऊ निर्माल्य.

चंद्र०—त्याला केव्हां पकडलं ?

वैष्णव०—हा आत्तांच.

चंद्र०—कुणी पकडलं ?

वैष्णव०—शा–शा—

चंद्र०—लौकर सांगा. शार्दूलानं का ?

वैष्णव०—होय–त्यांनींच.

चंद्र०—त्याला कुठं घेऊन गेले ?

वैष्णव०—यंत्रागारांत.

चंद्र०—बस्स, पुरे झालं. त्या मुलाला जर तुमचीं कांहीं रहस्यं माहीत असतील तर तुम्ही आतांच्या आतां हा गांव सोडून निघून जा. वाटेल त्या यातना देऊन शार्दूल तीं बाहेर काढील. मी शार्दूलाकडे जातों. त्याच्या

कर्तव्यांत मला अडथळा करतां येणार नाहीं खरा, पण इथून पळून जाण्या-इतका अवधी तुम्हांला मिळेल अशी व्यवस्था मी करतों. माझं एवढं ऐका. आत्तांच्या आत्तां पळून जा! (जातो.)

निवे०—बाबा,—बाबा, निर्माल्याचं काय होणार! कसं त्याचं रक्षण करतां येईल!

विष्णु०—आतां त्याचा रक्षणकर्ता एक नारायण. त्याची इच्छा असेल तसं होईल!

निवे०—बाळ निर्माल्य, तुला न पकडतां त्या चांडाळांनीं मलाच पकडलं असतं तर!

विष्णु०—बाळे, तुला दुसरीं कामं आहेत.—निवेदिते, एकदां दृढनिश्चय करून ज्या मार्गावर आपण पाऊल ठेवलं, त्या मार्गांतला एकजण पडला म्हणून आपली गती आपणच कुंठित करून घ्यायची का?

निवे०—नाहीं बाबा, आतां पाऊल मागं घेणार नाहीं.

विष्णु०—समज, विडंबनापूर्ण मृत्यू तुझ्यासमोर दिसला तर!

निवे०—तरीही माझं मन यापुढं एक क्षणभरही ढळणार नाहीं.

विष्णु०—निवेदिते, श्रीकृष्णाच्या चरणीं तुझं निवेदन केलं आहे, म्हणून तूं निवेदिता. श्रीकृष्णाखेरीज तुझं दुसरं कुणी नाहीं. बाप नाहीं, आई नाहीं, भाऊ नाहीं, इष्टमित्र नाहीं कुणीही नाहीं. सारा संसार भगवंताचा. निर्माल्य तुझा नाहीं, माझाही नाहीं, तोही त्याचाच. त्याला वांचवावं अशी जर भगवंताची इच्छा असेल, तर त्याच्या एका रोमालाही दुखवण्याची कुणाची प्राज्ञा नाहीं. चल आपण सर्वच महावनाकडे जाऊं!

(सर्व जातात.)

## प्रवेश २ रा



( स्थळ—यंत्रागार. )

शार्दूल—बरं मग पुढं ?

कर्ना०—मी लपत छपत तसाच त्याच्या मागनं गेलों. अर्ध्या वाटेवर त्याला वैष्णवचरण भेटला. त्याला त्यानं सांगितलं, कीं आज सर्व मंडळी एके ठिकाणीं जमण्याचं ठरलं आहे. तो पुढं कांहीं बोलणार होता. इतक्यांत त्याची माझ्यावर दृष्टी गेली; त्याबरोबर तो तसाच थांबला, आणि मीही त्याला एक-दम जाऊन पकडलं. वैष्णवचरण मात्र पळून गेला.

शार्दूल—कांहीं हरकत नाहीं. त्या पोराला पकडलं हेंच उत्तम झालं! बरं, त्यांची कांहीं जबानी घेतली का?

कर्ना०—नाहीं. आपल्या परवानगीविंचून कशी घेऊं?

शार्दूल—ठीक आहे. त्याला इकडे घेऊन ये. ( कर्नाटक जातो ) त्या निवे-दितेवर जर कांहीं पुरावा करतां येईल तर केवढी बहार होईल. एका धोंड्यानं मला पंचवीस पक्षी मारतां येतील. ( निर्माल्याला धऊन पहारेकरी कोरडे घेऊन येतात ) बाळ, तुझं नांव काय?

निर्माल्य—माझं नांव निर्माल्य.

शार्दूल—तुझे आईबाप कुठें आहेत?

निर्माल्य—माझं कुणीही नाहीं.

शार्दूल—मी विचारीन त्या प्रश्नांची उत्तरं खरीं खरीं दे. भिऊं नकोस. खरं सांगशील तर मी तुला मोहरांची एक थैली देईन.

निर्माल्य—मला कशाला हव्यात मोहरा!

शार्दूल—तूं वैष्णव आहस का?

निर्माल्य—मी नोकर आहें.

शार्दूल—कुणाचा नोकर?

निर्माल्य—धन्याचा.

शार्दूल—कोण तुझा धनी?

निर्माल्य—साऱ्या जगाचा धनी तोच माझा धनी.

शार्दूल—( स्वगत ) पोर दिसतं तितकं भोळं नाहीं. आतां जरा उग्र स्वरूप धारण केलं पाहिजे. बेटा आहे वैष्णवच ! ( उघड ) अशी लपं-डावीचीं उत्तरं देऊन जमणार नाहीं. समजलं ? सरळ जबाब दे. तूं वैष्णव आहेस का ?

निर्माल्य—मी कोण आहे तें एकदां आपणाला सांगितलं आहे.

शार्दूल—सरळ जबाब दे. तूं चार हाताच्या जनावराची पूजा करतोस का ?

निर्माल्य—जो सर्वाभूतीं भरला आहे, त्याचीच मी पूजा करतों, त्याला चारच काय–असंख्य हात आहेत.

शार्दूल—तर मग तूं वैष्णव आहेस यांत मुळींच शंका नाहीं. बोल, तूं वैष्णव आहेस ना ?

निर्माल्य—डोळे कशाला वटारतां ? मी एकदां सांगितलं ना—वैष्णव म्हणवून घेण्याची माझी पात्रता आहे कुठं ? मी वैष्णवांच्या चरणांचा दास आहें.

शार्दूल—हा कर्नाटक आतां सांगत होता, कीं सर्व वैष्णव एका जागीं जमणार आहेत, असं तूं कुणाला सांगत होतास. कोण हे वैष्णव ? बोल.

निर्माल्य—आडून ऐकणं वाईट ! काय हो कर्नाटक, आडून ऐकणाराचे कान कापावे असं म्हणतात, तें तुह्मांला माहीत आहे का ?

कर्ना०—थांब आतां, आधीं तुझेच कान कापतों.

शार्दूल—बोल–बोल लवकर–वैष्णव कुठं जमणार आहेत ?

निर्माल्य—मी बोलणार नाहीं.

शार्दूल—कुठं जमणार आहेत तें तुला ठाऊक आहे ?

निर्माल्य—आहे.

शार्दूल—कुठं जमणार आहेत ?

निर्माल्य—मी सांगणार नाहीं.

शार्दूल—हा कोरडा पाहिलास ? पाठीवर दोनच कोरडे बसतांच बोलूं लागशील.

निर्माल्य—हेंच काय तें तुमचं बळ ! खुशाल कोरडे लगावा. मी एक शब्दही बोलणार नाहीं.

शार्दूल—कर्कोटका, लगाव कोरडा–पहातोस काय ? लगाव कोरडा !

( कोरडे मारतात. ) कसं काय वाटतं ? आतां कां ओरडतोस ? बऱ्या गोष्टीनं बोल–नाहींतर—

निर्माल्य—मला ठार मारून टाका हवा तर–पण मी एक शब्दसुद्धां बोलणार नाहीं.

शार्दूल—विचार करून सर्व हकीकत सांग–नाहींतर आतां तुझी धडगत नाहीं.

निर्माल्य—मी जन्ममरणातीत आहे. फार तर माझ्या देहाचा नाश कराल; पण माझा आत्मा अमर आहे हें तुम्हांला कुठं ठाऊक आहे ?

शार्दूल—पुरे झाला तुझा वेदांत. कर्नाटका, इकडे आण त्याला. ( त्याला जवळ घेतो. ) बाळा, तुला पाहिल्याबरोबर मला माझ्या भावाची आठवण येते. ( स्वगत ) होता कुणाला भाऊ ह्मणा ! ( उघड ) तुला मारायचं माझ्या अगदीं जिवावर येतं. सगळी हकीकत सांगून टाक ना एकदम, म्हणजे अनायासें तुझा मार चुकेल.

निर्माल्य—माझ्या नारायणानं व्याधाचे बाण पुष्पांजली समजून सहन केले होते–मग मी या कोरड्यांना कां भ्यावं !

शार्दूल—( स्वगत ) धन्य आहे या वैष्णवांची ! धर्माच्या मागं लागल्यामुळं काय बेटे वेडे बनले आहेत ! स्वतःचं हित सुद्धां कळत नाहीं. हें एवढंस पोर ! पण काय ही सहनशीलता ! ( त्याला लोटून उघड ) असा बऱ्या बोलानं हा वळणार नाहीं. ए पोरा, आमचं पेषणयंत्र पाहिलं आहेस ? ती पहा ती घिरट, यांत धान्य दळण्याऐवजीं माणसं भरडलीं जातात. बऱ्या बोलानं जर सारी हकीकत सांगणार नाहींस, तर तुला या घिरटींत घालून तुझे पाय भरडून काढीन.

निर्माल्य—काय वाटेल तें करा. पण आतां मला कांहीं विचारूं नका ! विश्वासघात करून या देहाचं रक्षण करण्यांत काय पुरुषार्थ आहे ?

शार्दूल—नाहीं सांगणार ?

निर्माल्य—बिलकुल नाहीं.

शार्दूल—कर्नाटक, उचल याला आणि घाल पेषणयंत्रांत–( त्याला घेऊन जातात. ) चंद्रशेखर एकदां मला सांपडला पाहिजे. भर रस्त्यावर त्यानं माझा

अपमान करावा अं ! तो आला म्हणून–नाहींतर ती पोरटी माझ्या तावडींतून काय सुटली असती ! ( आंत घिरट वाजते, निर्माल्य ओरडूं लागतो. ) आतां कसं वाटतं माझ्या बाळा ?

**निर्माल्य**—( आंतून ) मारा–मारा–मला एकदम ठार करा–पण अशा यातना नका हो देऊं !

**शार्दूल**—बोल. अजून बोल.

**निर्माल्य**—नाहीं मला बोलतां येत नाहीं; शपथ घेतली आहे

**शार्दूल**—कर्नाटका, फिरव घिरट !

**निर्माल्य**—( आंतून ) मेलों–मेलों–नारायण ! नारायण !(मूर्छित पडतो.)

**शार्दूल**—अरे, मूर्छित पडलं वाटतं पोर ! इकडे आणा त्याला. मरायचा एकादा पटकन ! ( त्याला आणतात. ) नाहीं–अजून जिवंत आहे. अरे, थोडं पाणी घाल त्याच्या तोंडांत.

**कर्ना०**—( पाहून ) जरा जरा डोळे उघडतो आहे.

**निर्माल्य**—नारायण–नारायण–जय श्रीकृष्ण !

**शार्दूल**—अजून बोल. नाहींतर पुनः घिरटींत घालतो.

**निर्माल्य**—( कांपित स्वरानें ) महावनांत !

**शार्दूल**—कुठल्या महावनांत ?

**निर्माल्य**—अशोक स्तूपाजवळच्या महावनांत.

**शार्दूल**—कोणत्या वेळीं ?

**निर्माल्य**—आज दोन प्रहर रात्रीच्या वेळीं–( रडूं लागतो )

**शार्दूल**—गप्प बैस. तुला माहीत असलेल्या सर्व वैष्णवांचीं नांवं सांग.

**निर्माल्य**—मी सांगणार नाहीं–मला ठार मारा–ठार मारा ! !

**शार्दूल**—तुला ठार केल्यावर मग गंमत ती काय राहिली ? तुझ्याकडनं सारी हकीकत निघालीच पाहिजे–वैष्णवांची नांवं सांग.

**निर्माल्य**—नारायणा, माझी वाचा काढून घे. आतां मला घिरटला तरी माझ्या तोंडून शब्द निघूं देऊं नकोस ! नारायणा, मला क्षमा कर.

**कर्ना०**—( स्वगत ) तेवढया दरिद्री नारायणाचा पत्ता लागला असता तर बरं झालं असतं. हा याचा कुठला नारायण ?

शार्दूल—ठीक आहे. पोरा, तुझा निगरगट्टपणा किती दिवस टिकतो तेंच मला आतां पाहूं दे. पोर म्हणून थोडी दया केली—घिरट जोरानं फिरवूं दिली नाहीं, पण आतां सारी दया एका बाजुला ठेऊन तुझ्या तंगड्याच कांतून काढतों पहा. कर्नाटका, उचल याला, आणि घाल त्या घिरटींत. ( चंद्रशेखर व सुमंत येतात. )

चंद्र०—आतां घिरटींत नाहीं—त्या मुलाची जागा या चंद्रशेखराच्या वक्षः-स्थलावर ! ( त्याला पोटाशीं घेतो. ) तुम्ही काय माणसं आहांत ! या एवढ्याशा मुलाला पेषणयंत्रांत लोटतांना तुम्हांला शरमसुद्धा कशी वाटली नाहीं !

शार्दूल—कर्नाटका, ओढ त्या पोराला आणि घाल घिरटींत—पहातोस काय !

चंद्र०—कर्नाटक, मला ओळखतोस ?

शार्दूल—माझ्या कर्तव्यांत हात घालायची प्रतिनिधींना काय जरूर ?

चंद्र०—बस्स् ! मुलाला माझ्या स्वाधीन करा, नाहींतर मगधेश्वराचं नांव घेऊन तरवार उपसा.

शार्दूल—राजकार्यात आपण अडथळा आणतां आहांत—याचा आधीं जाब द्या.

चंद्र०—माझ्या नोकरांना मी जाब देत नसतों—त्यांना मी हुकूम करीत असतों. सोडा त्या मुलाला—चला, दूर व्हा.

शार्दूल—( स्वगत ) छेः बिघडलं सारं ! आतां माफीच मागावी लागणार. काढूं याचं उट्टं केव्हांतरी ! ( उघड ) माझी चूक झाली. मला क्षमा करा. सोडा रे त्या मुलाचीं बंधनं. येतों महाराज. ( मुजरा करून जातो. )

चंद्र—थोडं पाणी आणा कुणीतरी. निर्माल्य—बाळ निर्माल्य—डोळे उघड पाहूं !

निर्माल्य—नाहीं सोसवत—नाहीं सोसवत—धांव नारायणा !

चंद्र०—हें घे पाणी. पी थोडं म्हणजे सावध होशील.

निर्माल्य—नको—नको—मला ठार मारा. मी विश्वासघातकी आहें. मला ठार मारा !

चंद्र०—काय म्हणतोस मुला ?

निर्माल्य—तसं माझ्या मनांत नव्हतं. पण शरीराच्या यातनेमुळें जीभ चटकन बोलून गेली. वैष्णव आज जमणार आहेत ती जागा मी चटकन बोलून गेलों.

चंद्र०—कुठले वैष्णव ? सांग—सांग लवकर.

निर्माल्य—मी सांगत नाहीं–मला सांगता येत नाहीं. पण कसंही करा महाराज, माझ्या ताईला वांचवा.

चंद्र०—कोण तुझी ताई?

निर्माल्य—निवेदिता.

चंद्र०—निवेदिता! तिच्यावर कोणतं संकट आलं आहे?

निर्माल्य—तीही आजरात्रीं त्याच ठिकाणीं जाणार आहे.

चंद्र०—कोणत्या जागीं? बोल लवकर.

निर्माल्य—अशोक स्तूपाजवळ महावनांत.

चंद्र०—ही गोष्ट शार्दूलाला सांगितलीस का?

निर्माल्य--सांगितली–माझा नाइलाज झाला!

चंद्र०—निवेदिता तिथं जाणार हें तुला खात्रीपूर्वक माहीत आहे?

निर्माल्य—खात्रीनं माहीत आहे. महाराज, मला ठार करा, पण माझ्या ताईला वांचवा.

चंद्र०—सुमंत, आत्तांच्या आत्तां कांहीं सशस्त्र सैनिक घेऊन महावनाकडे माझ्या मागोमाग या–मी पुढं चाललों. भिऊं नकोस बाळ! सुमंत, या मुलाला माझ्या वाड्यांत नेऊन ठेवा.

कर्नो०—महाराज, तो कैदी—

चंद्र०—चूप–त्याच्याबद्दल मी जबाबदार आहें. चला लवकर.

( सर्व जातात )

## प्रवेश ३ रा.



( स्थळः—महावन. चबुतऱ्यावर विष्णुमूर्ती; विष्णुदास माधवदास, निवेदिता. )

विष्णु०—शक्य तेवढ्या गुप्तपणानं नगरांतील गुप्त वैष्णवांना आपण काय तें कळवलंच आहे. बरेचसे वैष्णव उग्रचंडाच्या कोपाला यापूर्वीच बळी पडले आहेत. आतां फार थोडे शिल्लक राहिले आहेत. आतां पुढला मार्ग पाहिला पाहिजे. आतां यापुढं इथं राहिल्यास आज जे कांहीं दिसत आहेत, तेही उद्यां दिसणार नाहींत. आतां ग्रामत्यागाखेरीज दुसरा उपाय नाहीं. प्रत्येकानं आपापलीं कुलदैवतं बरोबर घेऊन वृंदावनाचा रस्ता सुधारला पाहिजे.

**माधव०**—ज्या ग्रामांत स्वस्थपणानं झोंपसुद्धां येतां येत नाहीं, जिथं बहुतेकांचीं घरं जळून गेलीं आहेत—कन्या, भगिनी, पत्नी यांचं पातिव्रत्य जिथं भ्रष्ट झालं आहे, देवळं जमिनदोस्त होऊन देवतांच्या पवित्र मूर्ती रस्त्यावर धूळ खात पडल्या आहेत, त्या ग्रामांत वास करणं नुसतं उचित नाहीं, इतकंच नव्हे—तर महापाप आहे! ईश्वर जिथं ठेवील तेंच आपलं घर असं समजून आज गृहत्याग केलाच पाहिजे.

**विष्णु:**—तुम्हांला आणखी काय सांगूं? तुमचा अध्यवसाय नि भगवद्भक्ती पाहून माझं हृदय भरून येतं. तुम्हींच खरे वैष्णव आहांत. प्रलोभनानं, अत्याचारानं, सुखदुःखानं, ममतेच्या आकर्षणानं किंवा प्रिय वस्तूंच्या विरहानं, कोणत्याही स्थितींत ज्यांची ईश्वरावरील श्रद्धा विचलित होत नाहीं, ते नुसते मनुष्य नव्हत तर मूर्तिमंत देवता—देवताच कां?—असे जे भक्त तेच स्वतः भगवंत!—भगवंतांनीं म्हटलं आहे—

नाहं वसामि वैकुंठे योगिनां हृदये न च।
मद्भक्ता यत्र गायंति तत्र तिष्ठामि नारद॥

आज तुम्हांला मी जसजसा पाहतों आहे, तसतसे माझ्या सर्वांगावर आनंदानं रोमांच उभे राहात आहेत; आनंदाच्या ओघानं डोळ्यांना पाझर फोडला आहे. असं वाटतं आहे—अहाहा! इतके गृहहीन नारायण आज नारायणाच्या शोधार्थ निघाले आहेत. माझ्या बंधूंनों, उग्रचंडावर राग धरूं नका. नारायणाचीं असंख्य रूपं आहेत. या राक्षसीवृत्तीच्या आड जी संहारस्वरूपी मूर्ति मला दिसते आहे, त्याच नारायणाची सौम्यमूर्ती प्रेमानं त्रिभंग होऊन तुमच्या हृदयांत वास करते आहे. म्हणून म्हणतों, क्लेशाला क्लेश म्हणूं नका, हृदयांत त्याच्या पादपद्माचं ध्यान करा. शोकावेगानं श्रद्धा डळमळूं देऊं नका. कंठानं भगवंताचा नामघोष करा. संकटांत भक्त प्रल्हादाचें स्मरण करा म्हणजे तो नृसिंहरूपधारी तुमच्या संकटाचीं आंतडी फाडून काढील. या कलियुगांत आयुष्याचं वैपुल्य नाहीं. साधनांना सामर्थ्य नाहीं. तपस्येला अवकाश नाहीं. शास्त्रांना स्वरूप नाहीं! म्हणून पराशरांनीं म्हटलं आहे कीं, नामसंकीर्तनाखेरीज "कलौ नास्त्येव नास्त्येव नास्त्येव गतिरन्यथा" (वैष्णवचरण धांवत येतो.)

**वैष्णव०**—घात झाला—घात झाला! पळा, पळा—कुणीं विश्वासघातक्यानं आमचा पत्ता शत्रूला सांगितला!

**माधव०**—म्हणतां काय?

वैष्णव०---नगरपाल शार्दूल आपले सैनिक घेऊन आम्हांला पकडायला येतो आहे. पळा---

सर्व०---पळा-पळा-तर---

विष्णु०---माझ्या सद्भक्तांनों, थांबा-पळूं नका-वैष्णव जन्ममरणातीत आहे. मग कां पळतां ? भयहर्त्या भगवंतांच्या पदकमलाशीं स्थिर उभे रहा. मरायचं हें आहेच. आज ना उद्यां--तें कांहीं चुकत नाहीं; पण अशा आनंदानं मरायची संधी पुनः मिळणार नाहीं. मरायच्यापूर्वी भगवंताचं नामसंकीर्तन करण्यापुरता अवकाश मिळतो आहे! नाम घेत घेत मरण्याची खात्री आहे, हें काय थोडं झालं? केवढी ही भगवंताची कृपा !---म्हणा---

श्रीकृष्ण गोविंद हरे मुरारे । हे नाथ नारायण वासुदेव ॥

शार्दूल०---( ससैन्य प्र. करून ) मारा---ठार मारा---वैष्णवांचा नायनाट करा.---( मारामार सुरू होते, एकजण विष्णुदासावर शस्त्र उगारतो ) मार या थेरड्याला, हाच दिसतो यांचा पुढारी---

निवे०---( धांवत पुढें येऊन ) नका-नका-त्यांना मारूं नका. म्हाताऱ्याला जीवदान द्या. वाटेल तर मला मारा---मला ठार करा---पण त्यांना सोडा---

शार्दूलः---थांब, तुझीही पाळी येईल---( विष्णुदासाला वार करतो. )

विष्णुः---अधरं मधुरं वदनं मधुरं । नयन मधुरं हसितं मधुरं ॥ हृदयं मधुरं गमनं मधुरं । मथुराधिपतेरखिलं मधुरं ॥ ( मरतो )

निवे०ः---बाबा-बाबा,-ही विष्णुमूर्ति इथं टाकून कसे हो निघून गेलांत ! माझी तुझांला एवढी काळजी वाटत होती, पण मी जिवंत आहें आणि तुम्हीं मात्र मला टाकून गेलांत !

शार्दूलः---एवढं कां वाईट वाटून घेतेस ? ही पहा आली तुझी पाळी. ( तरवार उगारतो; चंद्रशेखर येऊन आपल्या तरवारीच्या फटक्यानं त्याची तरवार उडवून देतो. )

चंद्र०ः---खबरदार, मगधेश्वराच्या नांवानं मी हुकूम करतों आहें. तरवारी म्यान करा.

शार्दूलः---मारा-मारा-सर्वांना ठार मारा.

चंद्र०ः---खबरदार ! चंद्रशेखराचा हुकूम आहे, तरवारी म्यान करा. जो कुणी आतां या गरीब बिचाऱ्या प्राण्यांकडे नुसतं बोट दाखवील, त्याचं मस्तक त्याचक्षणीं धडापासून वेगळं होईल. (सर्व तरवारी म्यान करतात. पडदा पडतो.)

# अंक तिसरा



## प्रवेश पहिला.



**कादं०**—काय म्हणतेस अनंगे, मी इतकी का सुंदर दिसतें ?

**अनंगा**—भारीच सुंदर! जर की नाहीं मी पुरुष असतें, तर नुसते पंचप्राणच काय–पण, तन, मन, धन, जीवन, यौवन, दाढीमिशी सर्व कांहीं तुम्हांला अर्पण केलं असतं. नाहीं तर हा मेला शार्दूल—

**कादं०**—नांव देखील घेऊं नकोस मेल्याचं. दांडगट मेला! कांहीं रीतभात, चाल चलणूक हवी की नाहीं! बायकांशीं कसं बोलावं हें सुद्धां मेल्या धटिंगणाला कळत नाहीं.

**अनंगा**—चुकलां तुम्हीं. नवराच करायचा तर, असला वृथाभिमानी आडमुठा धटिंगणच बरा. मेला आपल्याच दिमाखांत चूर असायचा, त्यामुळें बायकोला सहज त्याच्या डोक्यावर चढतां येईल. एकादा शहाणा नवरा पावलोपावलीं थोडाच डोक्यावर नाचवणार आहे कुठल्या बायकोला ? मी सांगतें कादंबिनीबाई, खरं गृहसौख्य हवं असेल तर असल्याच एकाद्या वेडप्याला माळ घाला. लाथांखालीं तुडवला तरी हूं कीं चूं करायचा नाहीं.

**कादं०**—हे कसले मेले पुरुष ? शार्दूलासारखी असलीं दोन पायाचीं जनावरं पाहिलीं, कीं पुरुषजातीचा सुद्धां मला तिरस्कार वाटूं लागतो. असले शंभर पुरुष एकीकडे आणि चंद्रशेखर एकीकडे !

**अनंगा**—चंद्रशेखर ? तुम्हीं त्यांना वाखाणावं ? इतकं—

**कादं०**—म्हणजे ?

**अनंगा**—म्हणजे काय ? तुम्हीं ती गोष्ट ऐकली नाहीं वाटतं ?

**कादं०**—कसली गोष्ट ?

**अनंगा**—तुमच्या लाडक्या चंद्रशेखराच्या लीला नाहींच का तुम्हांला कळल्या ? सारं जग बोलतं आहे. वैष्णवीवर प्रेम ! काय बाई तरी मेलं अभद्रच एकेक !

कार्द०—कुठली वैष्णवी ? कुणाचं प्रेम ?

अनंगा—म्हणजे ? खरोखरच का तुम्हांला कांहीं माहित नाहीं ? आश्चर्यच म्हणायचं !

कार्द०—पण काय तें आधीं सांगशील तरी ?

अनंगा—हे पहा शार्दूल आले-त्यांनाच आतां अस्सल बातमी विचारून घ्या. त्यांनीं साऱ्या गमती प्रत्यक्ष पाहिल्या आहेत. ( शार्दूल येतो. )

कार्द०—यावं शार्दूल-आतां तुमच्चंच नांव माझ्या अगदीं ओठावर आलं होतं.

शार्दूल—महद्भाग्य माझ्या नांवाचं ! मला जरी नाहीं तरी माझ्या नांवाला तरी आपल्या या ओठांचा आस्वाद मिळाला, एवढयांतच मला मोठी धन्यता वाटते.

कार्द०—राज्यकारभाराचं अवजड ओझं दूर टाकून बरी संधी साधलीत इकडे येण्याची !

शार्दूल—आजच्या दिवसापुरता तरी कामांतून मोकळाच झालों आहे म्हणायचा.

कार्द०—तर मग चंद्रशेखर देखील एव्हांना दरबारांतून निघाले असतील !

शार्दूल—माझ्याबरोबरच तेही दरबारांतून निघाले—

कार्द०—खरंच ?... मला वाटलं होतं, कीं ते—

शार्दूल—काय वाटलं होतं म्हटलंत ?

कार्द०—मला वाटलं होतं—पण राहूं दे तें. आजकाल दरबारची हकीगत काय आहे ?

शार्दूल—चंद्रशेखरांना खेळायला हल्लीं एक नवीन बाहुली सांपडली आहे.

कार्द०—अस्सं ? आतां बाहुलीशीं खेळूं लागले वाटतं ! पण कसली बाहुली आहे ही ?

शार्दूल—तुम्हांला नाहीं कळलं म्हणतां ?... आं ? या अनंगादेवी तर इथंच आहेत ! तरीही कळलं नाहीं म्हणतां ?

कार्द०—अनंगा कित्ती कित्तीतरी गोष्टी सांगत होती-त्यांपैकीं तुम्हीं म्हणतां आहांत ती कुठली म्हणून मी समजावं ?

शार्दूल—नाहीं ! देवी, दुष्ट वार्ता कुणालाही केव्हांही माझ्यानं सांगवत नाहीं. अजूनपर्यंत जर ती बातमी तुम्हांला कळली नसेल तर माझ्या तोंडानं कळण्यांत तरी—

कादं०—कसली दुष्ट वार्ता ?... म्हणतां तरी काय ?—मला भारीच भय वाटतं बाई !...कांहींतरी अगदीं भयंकर प्रकार दिसतो आहे हा !—कां ? तुम्हीं बोलत कां नाहीं ? राजदरबारीं माझी मालमत्ता जप्त तर झाली नाहीं ना ? किंवा कुणी माझ्या नातलगांतलं एकादं माणूस मेलं तर नाहीं ?—हो-मग त्याच्यासाठीं मला रडलं पाहिजे कीं काय, हें तरी ठरवतां येईल.

शार्दूल—होय देवी, तुम्हांला रडणंच भाग पडेल. कुणासाठीं तें कळलं का ?.. तुमच्या अविश्वासू वल्लभासाठीं.

कादं०—अविश्वासू वल्लभ ? चंद्रशेखर केव्हांही—

शार्दूल—आम्ही चंद्रशेखराचं नांव तरी काढलं का ?

कादं०—तर मग तुम्हीं कुणासंबंधीं बोलत होतां ?

शार्दूल—तें खरं आहे—माझी चूक झाली खरी. चंद्रशेखरांसारख्यांचीं रहस्यं चारचौघांत बाहेर काढणं म्हणजे भयंकर अपराध तर खराच !—चला, जाऊं द्या. आपण दुसरं कांहीं बोलूं. अशा शंभर वैष्णवी माथ्यावर घेऊन नाचल्याचं फक्त राजप्रतिनिधीलाच शोभतं. आम्हांला तें काय होय ?

कादं०—कां बरं ? वल्लभाच्या गोष्टीखेरीज कोणत्या रमणीला दुसऱ्या गोष्टी आवडतील ?

शार्दूल—त्यांतूनही ही प्रणयकथा फारच काव्यमय आहे. मगध देशांतील महान् वैभवसंपन्न आणि अद्वितीय अधिकारापन्न अशी चंद्रशेखरासारखी व्यक्ति, एका क्षुद्र वैष्णवीकरतां तळमळत असतां, देवी कादंबिनीसारख्या असामान्य रूपगुणसंपन्न सुंदरीनं त्याच चंद्रशेखरासाठीं जीव कसावीस होऊं द्यावा, हें मोठं आश्चर्य आहे, असा जो लोकपवाद आहे तो मोठा काव्यमय आहे यांत शंका नाहीं.

कादं०—काय म्हणतां ? लोक असं बोलतात ? माझ्या संबंधानं असं बोलायला या लोकांना बरा धीर होतो म्हणायचा !

अनंगा--खरोखरच लोक असं म्हणतात. एवढंच नव्हे, तर चंद्रशेखरासारख्या असल्या उल्लू माणसावरील तुमच्या प्रेमाबद्दल तोंडभर थट्टासुद्धां करतात. नव्हे-तुमची फार फार कींव करतात !

कादं०—हेंच सांगण्यासाठीं का तुम्ही इथं आलां अहांत ?

शार्दूल—नाहीं देवी, कांहीं तरी तुमच्या उपयोगी पडावं म्हणून आलों आहें.

कादं०—तुह्मी काय माझ्या उपयोगी पडणार ?

शार्दूल—सूडाच्या कामीं तुह्मांला सहाय्य करणार.

कादं०—कुणाचा सूड ?—त्या मेल्या भिकारड्या वैष्णवीचा ?

शार्दूल—आणि त्याबरोबरच चंद्रशेखरचा.

कादं०—चंद्रशेखराचा ?... तो कसा ?

शार्दूल—वैष्णवांना शिक्षा देण्याचा संपूर्ण अधिकार महाराजांनीं चंद्रशेखरांना द्यावा आणि त्यानं त्यांतल्या वेंचक तरुणी निवडून काढून आपल्या वाड्यांत—कैदखान्यांत नव्हे बरं—कोंडून ठेवाव्यात, ही मोठी विचार करण्याजोगी गोष्ट आहे.

कादं०—मला कशाला सांगतां हें ? असल्या गोष्टी ऐकायला उग्रचंड महाराज समर्थ आहेत.

शार्दूल—देवी, राज्ञीचा चंद्रशेखरावर पूर्ण विश्वास आहे. आम्हीं असं बोलूं लागलों तर तिथल्या तिथं आमच्या जिभाच छाटून टाकल्या जातील !

कादं०—मग मी काय करावं म्हणतां ?—

शार्दूल—राज्ञीला भेटून तिला सर्व गोष्टी समजावून द्या. वैष्णवीला सिंहाच्या जबड्यांत पाठवणं हें काम तुमचं आहे-आमचं नव्हे.

कादं०—मी नाहीं असला चहाडबुचकेपणा करणार. ( उठून इकडे तिकडे फिरूं लागते. )

अनंगा०—बिचाऱ्या निवेदितेला देव शंभर वर्षं आयुष्य देवो--आणि सारीं लोकं तोंपर्यंत देवी कादंबिनी आसवं गाळोत. कादंबिनी, काय हें ! एका तुच्छ वैष्णवीच्या पायीं होत असलेला अपमान—नव्हे उपहास— सहन करून स्वस्थ बसणं शोभतं कां तुला ? जरा मन घट्ट कर—

कादं०—मी काय करूं तर?

शार्दूल—सूड घे–या अपमानाचा सूड घे. हा चंद्रशेखर—( चंद्रशेखर प्र. करतो. )

चंद्र—( प्र. क. ) हा सर्वांचा दासानुदास इथं हजर आहे. देवी, माझ्या येण्यानं तुमच्या एकांताचा भंग तर झाला नाहीं?

शार्दूल—राजप्रतिनिधींना आडून ऐकण्याची संवय आहे, हें मला माहीत नव्हतं—

चंद्र०—कां बरं? एवढा वेळ माझ्यावरच टीका चालली होती वाटतं? कादंबिनी, माझं गुणकीर्तन करून शार्दूलांनीं तुला कंटाळवलं तर नाहीं?...कां शार्दूल? बोलत कां नाहीं? काल महावनांत मिळालेल्या धक्क्यांतून अजून सावध झालां नाहींत वाटतं?

शार्दूल—चांगला सावध झालों आहें म्हणून तर तुम्हाला इथं दिसतों आहें.

चंद्र०—बरोबर आहे. धक्का सहन न करायला तुम्हीं कांहीं तसलं एक अर्भकही नाहीं किंवा अबला बालिकाही नाहीं.

शार्दूल—तो पोर आणि ती पोरटी दोघंही गुन्हेगार होतीं–आणि माझं कर्तव्य बजावल्याखेरीज मला गत्यंतर नव्हतं.

चंद्र०—कर्तव्य? तुम्हीं अमानुष अत्याचाराला कर्तव्य म्हणतां वाटतं? खरोखर, असलं कर्तव्यपालन मगध देशालाच शोभतं! कादंबिनी, माझ्या येण्यानं तुमच्या खासगी कामांत व्यत्यय तर आला नाहीं ना? तसं असेल तर–

कादं०—नाहीं–नाहीं–जाऊं नका. मी तुम्हाला कांहीं विचारणार आहें.

अनंगा०—( हातांतील पंखा खालीं टाकून ) जातें बाई मी. मघांच निघत होतें. इतक्यांत चंद्रशेखर आले. ( शार्दूलास ) कां? येतां का तुम्हीं? तुम्हीं यावं हें बरं, असं आपलं मला वाटतं!—आत्तांच दोघांनीं जीं उग्रस्वरूपं धारण केलीं होतीं ती आठवलीं, म्हणजे तुम्हां दोघांना एका जागीं राहूं देणं मला तरी भयंकर वाटतं.

चंद्र०—माझ्यासाठीं तरी तुम्हांला नको भ्यायला. माझ्यासमोर माझ्यावर हात उचलायची कुणाचीही छाती नाहीं. माझं कुणी अनिष्ट करूं शकेल तर तें माझ्या पाठीमागंच. उघड उघड तरवारीला तरवार देण्यांत असल्या शंभर

शार्दूलांपासून या चंद्रशेखराला भय नाहीं. भय असलंच, तर तें मागनं कट्यार खुपसणाऱ्या विश्वासघातकी मारेकऱ्याचं.

शार्दूल—( तरवार उपसून ) असह्य-असह्य-हा अपमान असह्य आहे!

कादं०—हें काय शार्दूल ? तुम्ही कुठं आहांत कांहीं ध्यानांत आहे ? कृपा करून इथनं जा पाहूं-

शार्दूल—ठीक आहे-हा पहा चाललों.

चंद्र—( हंसून )...कुत्रासुद्धां इतका आज्ञाधारक नसतो.

अनंगा—( शार्दूलास ) चला—ऐकूंच नका कांहीं-अगदीं बोळे घाला कानांत. मला आहे फार निकडीचं काम-येतां कीं नाहीं बोला पाहूं.

शार्दूल—( तरवार म्यान करतो ) चला.

अनंगा—येतें बरं कादंबिनी. चंद्रशेखर, तुमच्या त्या वैष्णवीला चांगली जपा बरं. तिच्यासाठीं राजाधिराजांच्या कोपाला मात्र बळी पडूं नका. घटकाभर करमणुकीला असलीं साधनं बरीं असतात खरीं, पण मन गुंतवाल तर मानही जाईल—वेळीं प्राणही जाईल. सावध रहा बरं-सावध रहा-( जातात. )

चंद्र०—भिऊं नकोस. हा चंद्रशेखर केव्हांही बेसावध नसतो. ( कादंबिनीस ) देवी, मला मुद्दाम कां बोलावलं ?

कादं०—नाइलाजानं येणं भाग पडलं वाटतं !

चंद्र०—नाइलाजानं ! हे शब्द देवी कादंबिनीच्या तोंडी शोभतात का !

कादं०—पुरे झालीं हीं तोंडदेखलीं भाषणं. मला नकोत आतां तीं.

चंद्र०—मग काय पाहिजे !...कांहीं जवाहीर !

कादं—समजा घटकाभर, मला जवाहीरच पाहिजे.

चंद्र०—बोल, किती पाहिजे ? माझं रत्नभांडारच तुझ्या हवालीं करतों. कां करूं नये ? तें परत न मिळण्याची कांहीं मला भीती नाहीं.

कादं०—मलाही परत मिळण्याची खात्री असती तर माझं सारं रत्नभांडार मी तुमच्या स्वाधीन केलं असतं.

चंद्र०—मला अशीं खोंचदार भाषणं चांगलींशी कळत नाहींत.

कादं०—नाहींच कळायचीं.

चंद्र०—असलीं भाषणं कळून न घेणंच बरं.

कादं०—इतकी तुमच्या उपेक्षेला मी कां पात्र झालें ?

चंद्र०—असं मी कुठं म्हटलं कादंबिनी ? कादंबिनी देवी म्हणजे या पाटलीपुत्राचें भूषण आहे, असंच प्रत्येक नागरीक सांगेल.

कादं०—पण चंद्रशेखरांच्या मतानं, ती एका व्यक्तीखेरीज मात्र अशी ठरेल—असंच ना ? आतां कां बोलत नाहीं ? चंद्रशेखर, तुम्ही संपत्तिमान आहांत, माझीही संपत्ती कांहीं थोडी थोडकी नाहीं; दोन्हीं संपत्ती एकत्र केल्या, तर मला वाटतं, हा मगधदेश देखील सहज विकत घेतां येईल.

चंद्र०—हें काय चाललं आहे कादंबिनी ? या तुझ्या असंबद्ध भाषणाचा अर्थ तरी काय ? बैस—खालीं बैस—आणि मन जरा स्वस्थ कर.

कादं०—चंद्रशेखर, तुम्हांला अगदींच का डोळे नाहींत ? माझं अंतःकरण तुम्हाला अगदीच का दिसत नाहीं ? चंद्रशेखर, माझं प्रेम म्हणजे भाबड्या पोरीची नैसर्गिक चपलता नव्हे. स्थिरबुद्धी झालेल्या तरुणीच्या हृदयांतील हा ज्वाज्वल्य मनोविकार आहे. चंद्रशेखर, या अपार प्रेमसमुद्राला धैर्याच्या वाळूचा बांध घालून अजूनपर्यंत मी अटकावूं पहात होतें—पण आज तो बांध ढासळला. वाळूचाच बांध किं नाहीं तो ?—माझा देह, मन, प्राण सारीं कांहीं या प्रेमसमुद्राच्या ओघासरशीं वहात जाऊन मी आतां बोलतें आहें ! हें ध्यानांत घेऊन मला क्षमा करा.

चंद्र०—कादंबिनी, तुझ्या या भाषणानं माझ्या हृदयावर वज्राघात होतो आहे. खरोखर तूं मला लाजवलंस ! एवढी तूं प्रेममयी मूर्ती—आणि मी हतभागी मात्र—

कादं०—चंद्रशेखर !—

चंद्र०—कादंबिनी, माझं वर्तन अविश्वसनीय नसावं अशी माझी इच्छा आहे. या अयाचित प्रेमदानानं खरोखर तूं माझा अकल्पित सन्मान केला आहेस आणि म्हणूनच जन्मभर मी याबद्दल कृतज्ञ राहीन. कादंबिनी, पुरुषानं स्त्रीजातीला जेवढा मान देणं अवश्य आहे, तेवढा सन्मान—तेवढा स्नेह—

कादं०—स्नेह ? मी प्रेम मागतें आहें. महाराज, स्नेहाची मला कमतरता नाहीं.

चंद्र०—माझं सर्वस्व मी तुला अर्पण करीन.

कादं०—सर्वस्व अर्पण कराल ? कुणाला ? मला कीं त्या वैष्णवीला ? मला जर सर्वस्व दिलंत, तर तिला काय द्याल ?

चंद्र०—एवढयासाठींच का मला बोलवलंस ?

कादं०—नाहीं. खरोखर नाहीं. मी बोलावणं पाठवल्यानंतर मला ही वैष्णवीची हकीगत कळली. पण विचारतें, ती खरी का ? खरोखरच खरी का ?... तुमचं निवेदितेवर प्रेम आहे ?—प्रेम आहे का ? आहे का ? तर मग चंद्रशेखर जादुटोण्याला बळी पडले खास ! रस्त्यावरच्या एका भिकारणीच्या पोरीचं गोंडस तोंड पाहून आमचे शहाणे प्रतिनिधी बुद्धीभ्रष्ट झाले ! एका घाणेरड्या, ओंगळ, दरोडेखोरांच्या सहवासांतल्या, देशाला कलंकभूत असलेल्या, जातिभ्रष्टा, धर्महीना, चेटकिणीवर चंद्रशेखरांचं प्रेम ? हः हः हः !

चंद्र०—चूप रहा, कादंबिनी, मी असली भाषणं ऐकायला इथं आलों नाहीं.

कादं०—असली भाषणं मी तुम्हांला ऐकायला लावीनच लावीन.

चंद्र०—नाहीं ऐकणार,—ऐकून घेणार नाहीं—हा मी चाललों पहा—( जाऊं लागतो. )

कादं०—( त्याचा हात धरून ) नाहीं. सारं कांहीं ऐकल्याखेरीज मी तुम्हांला जाऊं देणार नाहीं. चंद्रशेखर, प्रणय म्हणजे सुखाचा समुद्र आहे खरा, पण त्यात, लज्जा, भय, अपमान, उपहासासारखे मगरही रहात असतात. सावध व्हा, चंद्रशेखर, सावध व्हा ! हृदयाशीं धरलेला प्रेमरज्जू पायांखाली तुडवला, तर भयंकर विषारी भुजंग बनतो बरं. पायानं लोटून द्यायला ही कादंबिनी कांहीं अल्लड पोर नाहीं. लाथेनं लोटलीत तर कादंबिनीची भुजंगिनी होईल.

चंद्र०—चंद्रशेखराला उघड उघड भय दाखवण्याइतकी कादंबिनी उन्मत्त झाली आहे का ?

कादं०—उन्मत्त ?—मी ?...हाय दैवा ! यापेक्षां अधःपात तो काय राहिला ?

चंद्र०—नाहीं—देवी, खऱ्या प्रेमानं अधःपात होत नाहीं—विश्वासघातकता ही मात्र अधःपाताची माता आहे.

कादं०—चंद्रशेखर, मला हा वेदांत नको आहे. मी एकच जाणतें—प्रेम किंवा द्वेष. बोला, यांतलं तुम्हाला कोणतं पाहिजे ?—चंद्रशेखर, इतके का तुम्ही निर्बुद्ध झालांत ? त्या वैष्णवीला तुम्हीं आपल्या वाड्यांत आणून ठेवल्याचं साऱ्या मगध देशाला कळून चुकलं आहे.

चंद्र०—कळलं असेल—मला काय त्याचं ?

कादं०—एकूण ही हकीगत खरी तर ?

चंद्र०—होय, अगदीं खरी आहे. ऐक, कादंबिनी, निवेदितेवर माझं प्राणापेक्षांही प्रेम आहे. त्याचा मोबदला मला मिळाला नाहीं—निष्कारण मी तिच्या विनवण्या करतों आहे मात्र.

कादं०—मेलं आश्चर्य तें आणखी काय असतं ? एका गलिच्छ वैष्णवीच्या निष्कारण विनवण्या ? इश्श !

चंद्र०—गोष्ट खरी आहे. कादंबिनी, माझ्याविषयीं तूं हवं तें बोल. मला त्याचं वाईट वाटणार नाहीं. पण निवेदितेला उद्देशून बोललेला एकादा कटु शब्दसुद्धां सहन करणं मला अशक्य होईल. मग ती देवी कादंबिनी असो, किंवा दुसरी कुणीही असो. समजलं ? निवेदिता या मर्त्यलोकींची नव्हे. तिला कपट माहीत नाहीं, प्रतारणा तिच्या ओळखीची नाहीं, प्रेम म्हणजे काय हें देखील तिला कळत नाहीं. ती फुलासारखी निर्मळ आहे, तुषारासारखी पवित्र आहे, तप्त सुवर्णासारखी उज्वल आहे. वैष्णव धर्म म्हणजे काय आहे तें तिला माहीत नाहीं. पण त्या धर्माच्या प्रभावामुळंच जर निवेदितेसारखीं रत्नं निपजत असतील, तर सर्व जगाला एकाकालीं तोच धर्म स्वीकारून पवित्र व्हावं लागेल.

कादं०—माझ्यासमोर असल्या गोष्टी बोलायला तुम्हांला भय वाटत नाहीं का ?

चंद्र०—कां भय वाटावं ?

कादं०—ही हकीगत मी बाहेर फोडली तर ?

चंद्र०—ठीक आहे !

कादं०—'ठीक आहे' काय ? राजा उग्रचंडांना सांगितली तर ?

चंद्र—राजा उग्रचंडांना ?...काय म्हटलंस ? राजा उग्रचंडांना ?

कादं०—होय; खुद्द मगधेश्वरांना.

चंद्र०—कादंबिनी केव्हांही चंद्रशेखराशीं विश्वासघात करणार नाहीं.

कादं०—तर मग निवेदितेची आशा सोडा.

चंद्र०—प्राणांतीही नाहीं.

कादं०—तर मग मगधेश्वराच्या कोपवन्हींत जळून भस्म व्हा.

चंद्र०—चंद्रशेखराला भेवडावूं पहातेस ?—तुझा प्रचंड क्रोधानल—तुझा द्वेष—मगधेश्वर उग्रचंड आणि त्याचं असंख्य सैन्य, यांतून निवेदितेची माझ्यापासून ताटातूट करण्याची एकाचीही प्राज्ञा नाहीं. माझं सर्व मन यावेळीं निवेदितामय झालं आहे. माझं सारं ध्यान, ज्ञान, चिंतन काय ती एक निवेदिता. झालं ?—मुक्तकंठानं सारी हकीकत तुला सांगून टाकली. जा—आतां काय वाटेल तें कर. हा मी चाललों.

कादं०—चंद्रशेखर—एक क्षणभर थांबा. एक शब्द ऐका.

चंद्र०—फार क्षण झाले इथं ! आतां एक क्षणभरही मी थांबणार नाहीं. पुरुषानं स्त्रीशीं वाग्युद्ध करणं केव्हांही चांगलं नाहीं. येतों आतां—(जातो)

कादं०—( कोचावर पडून रडूं लागते; कांहीं वेळानें उठून—) मी नकोशी झालें का ! त्या ओंगळवाण्या भिकारड्या वैष्णवीसाठीं घनकनकसंपन्न तरुणी नकोशी झाली का ?......निवेदितेसाठीं कादंबिनीचा अपमान अं ?—तिच्यासाठीं मला लोटून दिलं का ?.....प्रेमवन्हे, आतां एकदम विझून जा—आणि द्वेषाग्ने, तूं मात्र घडकावून पेट घे आणि चंद्रशेखराची त्यांत राखरांगोळी करून टाक. (जाते.)

---

## प्रवेश दुसरा

( शार्दूल व कर्नाटक )

कर्ना०—महाराज आतां इथंच येतील. आपल्याला फार वेळ तिष्ठत बसावं लागणार नाहीं.

शार्दूल—काय करूं !—एकदां महाराजांच्या मनावर परिणाम मात्र झाला पाहिजे. कठीण काय तें तेवढंच आहे. मग पहातों चंद्रशेखराची बहादूदुरी !

कर्ना०—फारच चढून गेले आहेत राजश्री ! असलीं माणसं अगोदर पुढं येतात कशीं, याचंच मला आश्चर्य वाटतं.

शार्दूल—चूप. ते पहा महाराज आले—( वेत्रवतिकांच्या खांद्यावर हात टाकून उग्रचंड प्र. क. )

उग्र०—कोण ? शार्दूल ? तो कोण दुसरा ? काय खलबतं चालली होतीं तुमचीं ? आमचा घात करायचा कट तर नाहीं ना करीत ?

शार्दूल---हें काय राजाधिराज ? अशी कल्पना तरी कशी येईल आमच्या मनांत ? आम्ही आत्तांच म्हणत होतों, कीं आमचे महाराज प्रतापशाली आहेतच, पण कवि आणि संगीतवेत्ता सम्राट मिळण्याचं भाग्य आमच्यासारखं सर्वांनाच लाभत नाहीं.

उग्र०---खरंच आहे. वैष्णवपुरीचा आपण जो यज्ञ केला तो , किती काव्यमय होता ! सर्व नगरी धडधड पेटत होती, चहूं बाजूंनीं पळून जाऊं पहाणाऱ्या वैष्णवांना आमचे सैनिक भाल्याच्या टोकानं मागं फिरवीत होते, धडाधड कोसळून पडणारीं अजस्र मंदिरं एका क्षणांत बेचीराख होत होतीं; त्यावेळीं आम्ही आपली आवडती सतार काढून तिच्यावर मल्हाराचे सूर छेडित बसलों. त्या पुरुषांच्या कर्कश आरोळ्या, बायकांचा जनानी स्वर आणि कोवळ्या पोरांचं नाजुक किंचाळणं, पडत असलेल्या मंदिरांचा धडधडाट, भाल्यांचा खणखणाट, भडकलेल्या आगीचा दणदणाट, यांच्याशीं माझ्या सतारीचे बोल साथ करीत होते. अहाहा--!

शार्दूल---अहाहा ! अजूनही तें स्मरण होतांच धाझ्या अंगावर रोमांच येतात.

कना०---माझ्या अंगावर कांटा येतो--नव्हे रोमांच येतात.

उग्र०---मारुतीनं लंकेचं दहन केलं पण त्याला ही असली काव्यमय कल्पना सुचली नाहीं.

शार्दूल---माकडच तें !--फार तर एखादा भुंकार केला असेल त्यानं ! पण गांव धडधड जळत असतां शांत चित्तानं सतार छेडणं !...अहाहा ! केवढं मोठं काव्य हें ! राजाधिराज ह्मणजे मूर्तिमंत संगीताची देवता आहेत.

उग्र०---असं तर खरंच. या सटरफटर देवांचीं देवळं लोक कां बांधतात कोण जाणे ? आम्ही म्हणतों, शार्दूल, आम्ही मूर्तिमंत देवाचे अवतार आहोंत. दुष्टांचा नाश करून आमच्या भक्तांचा आम्हीं प्रतिपाळ करीत आहोंत. आमचंही देऊळ अवश्य असलं पाहिजे. आमच्याएवढी मोठी सुवर्णाची आमची मूर्ती त्यांत ठेवली पाहिजे. सर्व प्रजाजनांनीं त्रिकाळ पूजा, धूप, दीप, नैवेद्य दाखवून तिची आराधना केली पाहिजे. शार्दूल, उद्यांपासून तुम्ही या कामाला प्रारंभ करा.

शार्दूल०---अहाहा !--किती काव्यमय कल्पना !

उग्र०---काल्च्या वसंतोत्सवाच्या निमंत्रणाला शशिकिंकर कां हजर नव्हता ?

शार्दूल---त्याचं डोकं दुखत होतं महाराज.

उग्र०—वसंतोत्सवाच्या वेळीं दुखणारं डोकं मढावर रहाणं योग्य आहे असं तुम्हांला वाटतं का ? तो कां आला नाहीं तें मला माहीत आहे. त्याला मद्य घ्यायचं चुकवायचं होतं. जो मनुष्य मद्य पीत नाहीं तो जिवंत राहायला पात्र नाहीं. त्याला सांगा, तूं आज रात्रीं आत्महत्त्या कर. उद्यां सूर्योदयानंतर जर तो जिवंत असला तर सूर्यास्तापूर्वी त्याला जिवंत जाळणं भाग येईल. शार्दूल, हें काम तुमच्यावर सोपवण्यांत येतं आहे.

शार्दूल—मोठया आनंदानं मी तें पूर्ण करीन. सुरापान चुकवतो म्हणजे काय !

उग्र०—काव्यशून्यता. या मूर्खांना काव्य कसं कळत नाहीं ! शार्दूल, त्याची स्त्री विधवा झालीच पाहिजे बरं. तिनंही परवां आमच्या राज्ञीला लवून अभिनंदन केलं नाहीं. आमच्या राज्ञीपुढं न लवणारं मस्तक कुंकुमशून्य झालंच पाहिजे. ती विधवा झाल्यावर तिच्या सर्व संपत्तीची यादी तिच्याकडून तयार करवा. त्यांतील अर्धा भाग आमच्या खजिन्यांत जमा करा. आपखुषीनं ती देत नसेल, तर तिची सारीच संपत्ती खजिन्यांत जमा होईल आणि तिची पोरंबाळं आपोआप नाहींशीं होतील. काय ? सर्व हुकुम ध्यानांत आले ना ?

शार्दूल—प्रत्येक अक्षर ध्यानांत ठेवलं महाराज.

उग्र०—अरे ! दोघे आमच्या पिछाडीला कां उभे राहिले ? मागं राहिलेलीं माणसं मला कशी दिसतील ? समोर या—असे माझ्या नजरेसमोर उभे रहा. मागं उभे रहाणारे बहुधा जंबिया घेऊन येत असतात. पाहूं तुमचे हात ? शार्दूल, पहा, यांच्याकडे शस्त्रं नाहींत ना ? मागनं वार करायचा एखादा ! मला कळा-यचंसुद्धां नाहीं. ( सर्व समोर उभे राहतात. ) हं. आतां ठीक झालं. शार्दूल, वसंतोत्सवासाठीं आज कोणता खेळ योजला आहे ? कांहीं तरी नवीन पाहिजे. मल्लांच्या खेळाचा आतां मला अगदीं वीट आला आहे.

कर्नो०—दक्षिणेकडून दोघे बालगायक आज आले आहेत. त्यांचा कंठस्वर प्रत्यक्ष महाराजांसारखा आहे.

उग्र०—आमच्याशीं बरोबरी करतात ? बस्स् ! असल्या कंठाचा स्वर वीणेशीं न जुळवतां तरवारीच्या फटक्याशीं त्याची साथ झाली पाहिजे. शार्दूल, हा हुकुम ध्यानांत ठेवा.

शार्दूल—आज्ञा महाराज.

उग्र०—बरं, त्या वैष्णवांचं काय झालं ? त्यांचा निकाल लागत असला, तर या वसंतोत्सवाच्या वेळीं चालत्या मशाली चांगल्या सजल्या असत्या.

शार्दूल—काय सांगूं महाराज, ते कृमिकीटक अजूनपर्यंत महाराजांचा घात करण्याचे बेत करीतच आहेत.

उग्र०—असं म्हणतां ? असं कळूनसुद्धां अजून ते जिवंत राहिले आहेत ? घात करण्याचे बेत करताहेत म्हणे ! मगधेश्वराच्या जिवाला कांहीं किंमतच नाहीं का ? अजून ते कसे जिवंत राहिले ? बोला–

शार्दूल—कर्नाटकाच्या साहाय्यानं मी उद्यांच त्यांना स्वर्गी पाठवतों.

उग्र०—उद्यां पाठवतों, याचा अर्थ काय ? आमचं जीवित धोक्यांत असतां तुम्हीं लोक नुसते माशा मारीत बसतां, याचा अर्थ काय ? तुम्हांलाही जिवंत जाळले पाहिजे ? बोला–कुणाला अपराध हा ? सांगा लवकर.

शार्दूल—या दीन दासाचा कांहीं अपराध नाहीं.

उग्र०—मग कुणाचा ? नगररक्षक आहेत कुठं ? गुप्त हेर आहेत कुठं ? काय करताहेत सारे ?..सारेच माझ्या जिवावर उठलेले दिसतात !

शार्दूल—नगरपालाचा किंवा त्यांच्या सेवकांचा यांत कांहींच अपराध नाहीं, महाराज. ते सर्व आपलीं कामं चोख रीतीनं बजावीत होते. पण आयत्या वेळीं मधेंच अडथळा आल्यास त्यांनीं तरी काय करावं ? आयत्यावेळीं अधिकाऱ्यांच्या अधिकारांवर अधिकाऱ्यांनींच हल्ला केल्यास काम अपुरं राहिलं तर अपराधी कोण ?

उग्र०- म्हणतां तरी काय ? कुणी अडथळा केला त्यांना ?

शार्दूल—क्षमा असावी महाराज. त्यांचं नांव घेण्याचा माझा अधिकार नाहीं.

उग्र०—याचा अर्थ काय ? मगधेश्वराचं जीवित साशंकच रहावं तर ? तुम्हांला असल्या भेकडाचं नांव सांगतां येत नाहीं, म्हणून आम्हीं फुकट मरावं वाटतं ? तुम्हींही विश्वासघातकीच दिसतां आम्हांला ! बोला त्याचं नांव...हं. बोला !—

शार्दूल—राजाधिराजांचा हुकुमच झाला, आतां माझा नाइलाज आहे. महाराज, ती व्यक्ती दुसरी कुणी नसून—

उग्र०—म्हणजे ? मी स्वतःच कीं काय ?

शार्दूल—नाहीं सम्राट-पण-आपले प्रतिनिधी चंद्रशेखर-

उग्र०—चंद्रशेखर ? खबरदार ! भलत्याच माणसाचं नांव घ्यायला शरम नाहीं वाटत ?

शार्दूल—महाराज, माझं म्हणणं खरं कीं खोटं तें या कर्नाटकाळाच विचारून खात्री करून घ्यावी. राजाधिराजांच्या पवित्र आणि काव्यमय जीवितावरील संकट नाहींसं करण्याकरतां आम्हीं एका वैष्णवाच्या पोराला किरटींत घालून दळूं लागलों-

उग्र०—अहाहा, किती काव्यमय कल्पना !

शार्दूल—कटवाल्यांचं स्थान शोधून काढण्यासाठीं हें काव्य आम्हीं किरटींत होतों, तोंच चंद्रशेखर महाराजांनीं आम्हांला अडथळा करून तें पोर आमच्यापासनं हिसकावून नेलं. एका वैष्णवाच्या गोंडस पोरीला अशीच त्यांनीं आमच्या कैदेंतून पळवली. त्या पोरीकडून आम्हांला साऱ्या कटवाल्यांचा साऱ्या वैष्णवांचा बिनचुक पत्ता लागला असता. त्याच पोरीला पुनः आम्हीं मोठ्या प्रयासानं पकडलं आणि पुनः स्वतः चंद्रशेखर एका घटकेपूर्वी तिला सोडवून घेऊन गेले. वैष्णवांचं निर्मूलन करण्याचा सर्व भार ज्यांवर सोंपवला आहे ते चंद्रशेखरच्च जर स्वतः असं आचरण करूं लागले, तर राजाधिराजांचं अमूल्य जीवन विपन्नावस्थेंत राहणार नाहीं तर काय होणार ? (राणी व कादंबिनी येतात.)

उग्र०—ही पहा-राणी आली. प्रियतमे, अगदीं योग्य वेळीं आलीस. ऐकलंस ? तुझं आणि आमचं पवित्र जीवित नष्ट करण्याचा केवढा भयंकर कट चालला आहे, कळलं तुला ?

राणी—भयंकर कट ? कुणी सांगितलं हें ?

उग्र०—या शार्दूलांनीं. चंद्रशेखरावर त्यांचा आरोप आहे.

राणी—कसला आरोप ? भयंकर कटाचा ?

शार्दूल—कटाचा आरोप नव्हे-महाराज. तरी पण कटवाल्यांचं रक्षण—

उग्र०—तरी पण ? 'तरी पण' काय ? खुद्द मगधेश्वराच्या प्राणावर पाळी आली आणि तरीसुद्धां तुमचं 'तरी पण' चाललं आहे, याचा अर्थ काय ?

राणी—यांचं काय ऐकायचं ? या दरबारी लोकांना अधिकमात्रेनं गोष्टी वाढवून सांगायची सवयच असते. मला सारी हकीगत कळली आहे आणि

तेवढ्यासाठींच मी स्वारीचा शोध करीत होतें. खुद्द स्वारीला भेटल्याशिवाय मला कांहीं करणं योग्य वाटलं नाहीं.

उग्र०—मग सांग पाहूं आतां काय तें ? काय केलं चंद्रशखेरानं ?

राणी—महाराज, चंद्रशेखर अजून आपल्यासारखा जितेंद्रिय झाला नाहीं. किती झालं तरी अजून तरुण आहे. त्यामुळं एका सुंदर स्त्रीचं सामान्य सौंदर्य पाहून तो एकाएकीं हुरळून गेला आहे. त्यानं रक्षण केलं खरं, पण तें कुणाचं ! एवढ्या मोठ्या वैष्णव समाजांतल्या एका यःकश्चित् तरुणीचं.

उग्र०—एवढंच का ? नुसती एक तरणी पोर !

राणी—एका तरुणी खेरीज इतर कुणाला चंद्रशेखरांनीं सोडवल्याचा आरोप हे शार्दूलदेखील करूं शकणार नाहींत.

शार्दूल—अर्थातच नाहीं.

उग्र०—( हंसतो ) हाः हाः हाः हाः...केवळ एक पोरं ! ती काय करणार या प्रतापशाली मगधेश्वराचं ? ५५ पोरे !...कुणी सांगावं ? सापाचीं लहान पिल्लंच फार भयंकर असतात केव्हा कुठनं येऊन दंश करतात तें कळतसुद्धां नाहीं ! प्रियतमे, तुला वाटते तितकी ही बातमी क्षुल्लक नाहीं. शार्दूलांना हुकूम करून त्या पोरीला या पूर्वींच पकडून आणवलं पाहिजे होतं. फारच हलगर्जी-पणा झाला हा ! तुला वाटेल ती शिक्षा तिला दे. पण आधीं तिला पकडून आणीव. साऱ्या वैष्णवाचं निर्मूलन झालंच पाहिजे. वाटेल तर तिच्या अंगावर वाघाचं कातडं चढवून शिकारी कुत्रे तिच्या अंगावर सोडून दे, वाटेल तर तेल अंगावर ओतून तिची चालती मशाल कर—काय वाटेल तें कर; पण वैष्ण-वांचं बीज जगातून नाहींसं झालं पाहिजे. किती वेळां तरी मी या असल्या गमती केल्या आहेत. पुन्हां ही तशाच करूं. रस्त्यात वैष्णवांच्या कातड्याखेरीज दुसरी कसलीही मशाल जळूं देणार नाहीं. चला—सारे इथून चालते व्हा—शार्दूल, तुम्ही थांबा, तुम्हीं माझ्याबरोबर चला. या पोरटीला पकडण्याचा लेखी हुकूमच तुमच्याकडे देतों ! मगधेश्वराविरुद्ध कट करतात काय ? नुसते वैष्णवच काय—पण जे जे कुणी वैष्णवाशीं देणें घेणं, खाणं पिणं, उठणं बसणं, अगर दुसरा कसलाही व्यवहार करतील, त्या सर्वांना सरसहा पकडून शिक्षा द्यावी, असा लेखी हुकूमच तुम्हांला देतों; आमच्या वाड्याच्या चाऱ्ही बाजूचा पहारा दुपटीनं

वाढवा.–नाहीं, चौपट वाढवा. दया माया मुळींसुद्धां मनांत आणूं नका. ज्याचा संशय येईल त्याला बेधडक पकडा. या मूर्खांना माहीत नाहीं कीं मगधेश्वर अमर आहे. त्याला मारण्याचा प्रयत्न करतात वेडे ! सर्व उग्र देवता स्वतः हातांत शस्त्र घेऊन ज्या मगधेश्वराचं रक्षण करीत असतात, त्याचं हे काय वाकडं करणार ! वेडे !–मूर्ख ! मी अमर आहें, म्हणूनच मला कुणाचं भय वाटत नाहीं–आणि म्हणूनच प्रियतमे, या सर्व वैष्णवांना सरसहा जाळून टाकलं पाहिजे. चला शार्दूल, या टाळकुट्या वैष्णवांना पुनः एकदां आमचं सामर्थ्य किती आहे तें पाहूं द्या. ( जातात. )

**राणी**—काय कादंबिनी, पुरी झाली कीं नाहीं माझी प्रतिज्ञा ? झालं ना एकदां तुझ्या मनासारखं !

**कादं०**—राणीसाहेब, फार–फार उपकार झाले हे ! पण—

**राणी**—पण ? आतां 'पण' काय राहिलं ? कुणाबद्दल तुला एवढं वाईट वाटलं ?

**कादं०**—वैष्णवीबद्दल तर खात्रीनं नव्हे–पण राणीसाहेब, मगधेश्वरांच्या क्रोधाला चंद्रशेखरांचाच बळी पडला तर—

**राणी०**—मगधेश्वराचा क्रोध ? हा आतां पाहिलास ना मगधेश्वराचा क्रोध ! हा वेडे, त्याला एवढं भ्यायला नको कांहीं. मगधेश्वराच्या हातनं चंद्रशेखराचं कांहींसुद्धां बरं वाईट घडूं न देण्याची हमी मी घेतें–मग तर झालं ना ? हा शार्दूल, पूर्वींपासूनच चंद्रशेखराचा द्वेष करतो आहे. त्याला एवढंच एक निमित्त आयतं मिळालं, म्हणून मला आपलंच घोडं पुढं ढकलायला पाहतो आहे. म्हणून म्हणतें, साऱ्या हकीगती मला वेळच्यावेळीं कळवीत जा, म्हणजे मी वेळींच सारी खबरदारी घेइन. चंद्रशेखरांनाही वेळीं सावध केलेलं बरं. ( कादंबिनी रडूं लागते. ) हा वेडे ! रडतेस ? अग, सूड घ्यायचा असला तर मुळुमुळु रडून कसं होईल ?. . .मन अगदीं घट्ट केलं पाहिजे. तेवढी वैष्णवी त्याच्या दृष्टीआड झाली, कीं आपण होऊनच ते तुझ्या पायां पडत येतील. अगदीं नाहींच आले, तर महाराजांकडून तसा हुकूम देववीन. मग तर झालं ना ? मगधेश्वराची आज्ञा मोडण्याइतका चंद्रशेखर कांहीं वेडा नाहीं.

**कादं०**—राणीसाहेब, या आश्वासनानं मला किती धीर आला म्हणून सांगूं ! माझ्यासाठीं आपण किती बरं कष्ट घेत आहांत हे ! या आपल्या ऋणांतून मी आपली उतराई तरी कशी होऊं !

राणी०—आज उपकार झाले असं म्हणते आहेस खरी, पण उद्यां काय म्हणशील कोण जाणें! थोडी थांब बाई, एकदां चंद्रशेखर आपलासा करून घे आणि मग हीच बुद्धी टिकली तर मला धन्यवाद दे. अग वेडे, स्त्रीजात म्हणजे अवलंबी जात. पुरुष कसे आहेत हें लग्न झाल्याशिवाय आम्हांला कळत नसतं. लग्न व्हायच्यापूर्वी तरुणीला आपला वल्लभ फारच गोंडस वाटत असतो; पण तोच वल्लभ एकदां का स्वामीपदावर आरूढ झाला, म्हणजे एकदम कात टाकून पुरुष जातीचं कठोर स्वरूप दाखवूं लागतो. अशी हुरळून जाऊं नकोस एव्हांच. चल आतां—(जाते)

कादं०—पुरुष जातीचं कठोर स्वरूप खुशाल मला दिसूं दे. पण आधीं माझा चंद्रशेखर माझा स्वामी होऊं दे. एवढी विटंबना होते आहे, तरी मेलं मन सारखं तिकडेच धांवतं. एवढा माझा अनादर झाला, तरी देखील त्यांचा विसर पडत नाहीं—तरी देखील प्रेम केल्यावांचून राहवत नाहीं! कसलं मेलं हें बायकांचं मन!— (जाते)—

## प्रवेश तिसरा



(चंद्रशेखर आसनस्थ.)

चंद्र०—वसंतोत्सवाच्या आनंदांत सर्व निमग्न झाले आहेत! दुःखी काय तो एकटा मी! त्या एका सुंदर मुखचंद्राचं चिंतन करण्याखेरीज इतर कुठलाच व्यवसाय मला आवडेनासा झाला आहे. मुद्दाम आमंत्रण देऊन मित्र मंडळी बोलावून आणली, घटकाभर त्यांच्याबरोबर यथेच्छ सुरापान देखील केलं, पण मनाला स्वास्थ्य आहे कुठं? प्रणयविषानें जर्जर झालेल्या माझ्या देहावर मद्याचा देखील अंमल चढेनासा झाला आहे. निवेदितेचं नांव घेऊन सारे माझी थट्टा करतात. सर्वांना तो जसा कांहीं करमणुकीचा एक विषयच सांपडला आहे...छेः छेः, आतां ही हृदयांतली लज्जा लपवूं तरी कुठं? मित्रांच्या मुखावरचं थट्टेचं हास्य आणि मर्मभेदक उपहास सहन करणं अगदीं अशक्य झालं आहे. सर्वांना मजा मारूं दे. मी इथं एकांतांत बसून माझ्या निवेदितेचं ध्यान करणार. (भुजंग येतो.)

भुजंग—( प्रवेश करून ) वा वाः ! हा काय माणुसपणा झाला ? इथेनं कोठून निघून यायला आम्ही देखील काय तुझी प्रीतिपात्रं आहोत बाबा ?

चंद्र०—हें काय ? मेजवानीचा थाट टाकून तूं कां आलास ?

भुजंग—ह्या बाबतींत गुरु झालांत, महाराज, आपणच. सर्वांना पंक्तीवर बसवून स्वतः झुकांडी देणं बरं नव्हे हें ! मेजवानींत यथेच्छ मद्य पिऊन झोकांड्या द्याव्या—पण बाबा, झुकांडी देऊं नये. अनंगा देवी तर तुझ्याशिवाय मुळीं पानावरच बसत नाहीं. असलं नाजुक पात्र नाखुष झाल्यावर मेजवानींतलीं पात्रं काय नुसती चाटायचीं आहेत ? चल, बाबा चल.

चंद्र०—अनंगा देवी ?...

भुजंग—हो–हो–अनंगा देवी ! काय बिचारीनं चेहरा बनवला आहे पण ! नुसतं खुराड्यांतलं कबूतर ! पहा ना एकदां—एकदम हृदयाची क्रिया बंद होण्याइतका आनंद होईल.

चंद्र—मला आनंद ? कुणाला कधीं आनंद झाला आहे ? खऱ्या आनंदाचा अधिकारी आहे कोण ? भुजंग, खऱ्या सुखाचा उपभोग घेणं मानवांना अगम्य आहे. आनंदाच्या शोधार्थ माणूस उगीच तळमळत असतो, एवढंच.

भुजंग—आनंद जर शोधायचा असेल तर भांगेच्या लोट्यांत किंवा सुरेच्या सुरईत डोकावून पहा; किंवा ताज्या गुलाबाच्या नुकत्याच दंवानं डबडबलेल्या कळीसारख्या एखाद्या अनंगा देवीच्या मुखसंपुटांत तरी नजर फेंक.

चंद्र—खरं आहे. ताज्या गुलाबाची ताजी कळी ! स्त्रियांचं रूपसौंदर्य अगदीं असंच असतं. जरा हात लावतांच कोमेजून जायचं ! तेवढाच काय तो त्यांतला आनंद !

भुजंग—अनंगा देवी कांहीं कोमेजणारी कळी नव्हे. नुसता हात लावतांच कोमेजत तर नाहींच पण मातींत फेंका, ओढा, खेंचा, तोडा, तुडवा, काय वाटेल तें करा, टवटवीत ती टवटवीत ! एकदां पहा तर खरी तिला.

चंद्र०—कुणाला पाहूं ? अनंगेला ? मला तिची जरूरी नाहीं. असल्या वेसवांचा मला अगदीं तिटकारा आला आहे. जा आतां तूं—त्यांना सांग, कीं मी कांहीं जरूरीच्या कामांत गुंतलों आहें. काय वाटेल तें खरंखोटं—कांहीं तरी सांग—जा. पण इथनं एकदांचा निघून जा.

भुजंग—समजलों—बाबा, समजलों. त्या वैष्णवीचा हा सारा प्रताप! अरे—अरे—अरे—शेवटीं वैष्णव बनलास बेट्या!

चंद्र०—काय?—काय म्हटलंस? मी वैष्णव?—जा, भुजंग, इथनं निघून जा.

भुजंग—जातों बाबा. सध्यां तूं इतका पिसाळला आहेस, कीं एका लचक्या सरशीं एक शेर मास तोडून काढशील एकादा. छे रे बुवा! शेवटीं पोटांत कुत्र्याचे पेटे कुरकुरत का मरायला लावणार मला? नको रे बुवा!—पण थांब पाहूं, कुठंसा पिसाळला आहेस? काळजांत कीं पोटांत? पोटांत असेल तर वैद्याला बोलावून आणतों आणि काळजांत असेल तर त्या तुझ्या सुंदरीला हाक मार. दोघांचाही परिणाम एकच. वैद्य आणि बायका, दोन्ही सारख्याच बाबा. दोघेही प्राण वाचवतात—दोघेही चटकन् जीव घेतात! (खालीं बसतो)

चंद्र०—कुणाला बोलावूं म्हटलंस? निवेदितेला? तिला आणून काय फायदा? ती कांहीं इतर बायकांसारखी नाहीं. अशी स्त्री मी कुठंच पाहिली नाहीं. तिची पवित्रता—तिची तेजस्विता—तिची सरलता पाहून मी दिपून गेलों आहें. तिला आपलीशी करतां येत नाहीं—विसरतांही येत नाहीं. नुसत्या निर्भय चित्तानं तिच्याकडे पहाण्याचीही छाती होत नाहीं. तिची पवित्रता आणि माझं उद्दाम प्रेम, यामधें पर्वतासारखं कसलं तरी व्यवधान आहे. त्या पर्वतावर आघात देतां देता माझं हृदय चूरमार होत चाललं आहे. तरीही तो पर्वत तिळभरही पलीकडे सरकत नाहीं. पण भुजंग, काय वाटेल तें करून तो पर्वत लोटून टाकल्याखेरीज उपाय नाहीं. नाहीं तर खरोखर मला वेड लागेल.

भुजंग—अरे—हां—हां—असले प्रेमाचे पेंच मला पुष्कळ माहीत आहेत—आणि मी उकलले पण आहेत. भांग आणि भ्रूभंग यांची शेती करण्यांत मी माझं सारं आयुष्य घालवलं आहे. आतां कांहीं दोन्ही व्यवसाय चालवतां येत नाहींत; एकटीच भांग घेऊन बसलों आहें. पण बाबा, असल्या व्यवसायांत उपदेश करण्याचा मला जो अधिकार प्राप्त झाला आहे, त्या अन्वयें तुला सांगतों, आतां एक काम कर; निवेदितेला इथं आण. बेटी तुझी भूक वाढवते आहे. तिला म्हणावं, यापुढें मला तुझी जरूरी नाहीं. असं बोललास पुरे कीं 'माझ्या बाबारे' म्हणत तुझ्या गळीं पडलीच म्हणून समज.

चंद्र०—भुजंग, निवेदितेला तूं ओळखलं नाहींस म्हणून असं बोलतो आहेस.

भुजंग—नसेल तिला ओळखलं! पण तिच्या काक्या, माम्या, मावशा तर मी पाहिल्या आहेत! बायकांची जात तरी माझ्या ओळखीची आहे ना?

चंद्र०—निवेदिता स्त्रीधर्माची मूर्तिमंत देवता आहे.

भुजंग—खूप पाहिल्या आहेत असल्या देवता! ह्मणे धर्म! धर्म आणि पवित्रता हल्लीं मासळीबाजारांत रोख पैसे टिचून विकत मिळतात. धर्म घ्या, पवित्रता घ्या किंवा अस्सल बायकांची जात घ्या, पैसे मोजतांच मिळालीच पाहिजे. एवढं खरं, कीं मालाची किंमत मात्र बरोबर मोजली पाहिजे. वेळीं लिलाव चढवीत गेलं पाहिजे ह्मणजे माल पदरांत पडणारच. तूं श्रीमंत आहेस, पैक्याची तुला वाण पडणार नाहीं डोळ्याचं तोंड झांक, आणि थैलीचं तोंड उघडं ठेव—बाबा, पैका वाटेल तेवढा दे, पण काळीज मात्र कुणाला देऊं नकोस. तुझ्या काळजाच्या एका लचक्याची किंमत असल्या लाखों निवेदितांच्या पासंगालाही पुरणार नाहीं.

चंद्र०—तुझं म्हणणं बरोबर आहे. कोण आहे रे तिकडे—आज पकडून आणलेल्या त्या वैष्णवीला घेऊन ये. ( पडद्यांत—भजन ऐकूं येतें. ) ऐक, भुजंग, या निस्तब्ध रात्रीच्या वेळीं बंदिवासाच्या दुःसह यातना भोगीत असलेले हे वैष्णव समवेत कंठानें किती मर्मभेदी भजन करीत आहेत हे! भुजंग, हें संगीत ऐकतांच माझ्या हृदयांत कसली तरी अव्यक्त खळबळ सुरू होऊं लागते.

भुजंग—व्हायचीच तीं! हातापायांत साखळ्या पडल्या तरी बेट्यांना गाणं सुचतं तरी कसं? चंद्रशेखर, रात्रंदिवस हाच का या वैष्णवांचा उद्योग चाललेला असतो? जेवण तरी सुचतं का यांना? काय बेटे पहा, उद्यां मरण निश्चित ठरलेलं—पण गात आहेत! मरणाचं भयदेखील यांच्या गांवीं नाहीं का?

चंद्र—भुजंग, आतां निघून जा पाहूं—

भुजंग—छेः बुवा, एकवार त्या पोरटीचा मुखडा पाहणार आम्हीं! पायां पडतों बाबा, तिच्या बाहुपाशांच्या वेष्टनानं एकदां या माझ्या वाळलेल्या देहयष्टीला कांहीं ओलावा आला तर पाहणार आहें.

चंद्र—भुजंग, नीघ म्हणतों ना इथून?

भुजंग—समजलों—समजलों—तुझ्या प्रेमाच्या स्वर्गांत मग्न तूं थोडाच भागी-

दार घेणार आहेस ?—चाललों बाबा—चाललों—( जातो. रक्षक बेड्या घातलेल्या निवेदितेला घेऊन येतात )

चंद्र—कुणी हिला शृंखला घातल्या ?—पहातोस काय ? तोडून टाक त्या ! ( रक्षक तसें करतो ) सुंदरी, या तुझ्या अपमानाबद्दल मला फार वाईट वाटतं आहे. ही गोष्ट अगदीं माझ्या न कळत घडली गेली. केव्हांही माझा असा हुकूम नव्हता.

निवे०—आपल्या अनुग्रहाची मला पर्वा नाहीं महाराज. माझ्या सोबत्यांच्या दुःखाची वाटेकरीण होण्यांत मला उलट आनंदच वाटतो.

चंद्र०—असं कसं होईल ? तुझ्याशीं त्यांची तुलना करणंच मुळीं अप्रयोजक आहे.

निवे—तुलना कां करूं नये ? शृंखलेच्या यातना सहन करायला माझ्यापेक्षांही शक्तिहीन त्यांत पुष्कळ आहेत.

चंद्र०—सुंदरी, हा तुझा लावण्यमय कोमल देह ब्रह्मदेवानं शृंखलेच्या बंधनासाठीं घडवला नाहीं. चालेल—शृंखला शोभेल—पण ती प्रेमाची शृंखला.

निवे—महाराज, मला इथं कां आणलंत ?

चंद्र—तुझ्या रूपसुधेचं पान करण्यासाठीं. तुझा वीणाविनिंदित मधुर कंठस्वर ऐकण्यासाठीं. तुझ्या उज्वल ज्योतिनिर्भर नयनयुगुलांची शोभा अवलोकन करण्यासाठीं. सुंदर शोभेचा आधार अशा या तुझ्या मुखपद्माच्या सौरभाचं आघ्राण करण्यासाठीं.

निवे—कृपा करून मला जाऊं द्या.

चंद्र—कृपा कां ? आज्ञा म्हण. तुझी आज्ञा मला शिरोधार्य आहे.

निवे—माझ्या बंदिवान मित्रांकडे मला जाऊं द्या महाराज.

चंद्र०—तेवढंच मात्र अशक्य आहे. दुसरं कांहीं माग.

निवे०—मला दुसरं तिसरं कांही नको. त्यांची मुक्तता आणि त्यांचा सहवास, एवढे दोनच वर मला द्या.

चंद्र०—यांतील एकही गोष्ट होणं शक्य नाहीं. राजाज्ञेपुढें मला जातां येत नाहीं म्हणून तुझ्या मित्रांची मुक्तता होणं शक्य नाहीं—आणि तुझी

प्रार्थना पूर्ण करण्याच्या इच्छाशक्तीपेक्षां, तुझ्यावरील माझ्या प्रेमाची शक्ती अधीक बळावली असल्यामुळं तुला त्यांचा सहवासही मिळणं शक्य नाहीं.

निवे०—तर मग एकदांची काय ती शिक्षा तरी देऊन टाका.

चंद्र०—शिक्षा ? मी तुला शिक्षा देऊं ? या देहांत प्राण असेपर्यंत तुझ्या पायाला दर्भाचा एक अंकुरसुद्धां मी रुतूं देणार नाहीं. सुंदरी, माझ्या स्नेहाची तुला अपेक्षां नाहीं कां ?

निवे०—श्रद्धेशिवाय स्नेहाची अपेक्षा कशी उत्पन्न होईल ?

चंद्र०—माझ्यावर तुझा विश्वास नाहीं ?

निवे०—ज्याला आत्मसन्मान नाहीं—स्वतःच्या ठायीं ज्याची श्रद्धा नाहीं, त्याच्यावर माझा विश्वास कसा बसेल ?

चंद्र०—मला आत्मसन्मान नाहीं म्हणतेस ?

निवे०—स्त्रीजातीचा ज्याला आदर नाहीं त्याला आत्मसन्मान कसा कळणार ? पुरुषाच्या ठिकाणीं जेवढं कांहीं भव्य आणि सुंदर आहे, त्याचा स्त्रीजात हा एकच पवित्र आधार आहे.

चंद्र०—अशी स्त्री मला अजून भेटली नाहीं.

निवे०—साऱ्या पुरुषजातीच्या इच्छेनुरूप स्त्रियांचं चरित्र्य तयार होत असतं. हल्लींच्या काळांत, कोणता पुरुष स्वस्त्रीखेरीज इतर स्त्रियांच्या पावित्र्याची चाड बाळगतो आहे ?

चंद्र०—पवित्रता ?—हः हः हः हः !! कसली आली आहे पवित्रता ? न्याय अन्याय, पाप पुण्य, धर्म—अधर्म, हीं सर्व काय आहेत ? कांहींही नाहींत. अभ्यास आणि अवस्थेच्या विपर्यासानं या साऱ्यांची उत्पत्ती ! हा सारा माणसांचा भ्रम आहे. या धर्म अधर्माच्या चक्रांत आंधळा होऊन माणूस गिरक्या कां खातो माहिती आहे ? केवळ एका सुखासाठीं ! हजारों प्रयत्न केले तरीही ती दुष्प्राप्य वस्तू शोधतांही शोधली जात नाहीं, मग मिळण्याचं तर नांवच नको. हें असलं सुख, जर माणसासमोर अयाचित येऊन पडलं, तर त्यानं तें कां दूर लोटावं ?

निवे०—सुख कुणाला सहज मिळत नाहीं, हें खरं आहे. कारण सुखाच्या शोधाची जागाच मुळीं चुकते. चैन आणि सुख एक नव्हत. चैन मर्त्यलोकाच्या मानवानं घडवलेली आणि सुख म्हणजे ईश्वराची सृष्टी.

चंद्र०—कुठल्या ईश्वराची ?

निवे०—दुसऱ्या कुठल्या ? अनादि-अव्यय-अनंत-असीम-अक्षय असा जगदीश्वर एकच आहे.

चंद्र०—साऱ्या देवांना आम्ही हींच विशेषणं देतों. सारेच देव काय अनादि अनंत आहेत ?

निवे०—ईश्वर एकच-दोन नाहींत.

चंद्र०—तूं वैष्णव आहेस यांत शंका नाहीं. आतां कां बोलत नाहींस ? निवेदिते, भिऊं नकोस. माझ्यापासून तुला भय नाहीं. पण खरं सांग, खरोखरच तूं वैष्णव आहेस कां ?

निवे०—मी नाकबूल कसं करूं ?

चंद्र०—निवेदिते, तूं वैष्णव कां झालीस ?

निवे०—सूर्य कां प्रकाशतो ? फुलं कां विकासतात ? पक्षी कां गातात ? सर्व त्याची इच्छा.

चंद्र०—पुरे कर, सुंदरी, तुझ्या तारुण्याला हा रुक्ष वेदांत शोभत नाहीं. म्हाताऱ्या थोडांनीं खुशाल वेदांताची काथ्याकूट करावी. आह्मां उभयतांच्या प्रत्येक नसेंत यौवनाचं रक्त उसळतं आहे. नुकतंच आपण संसाराच्या दरवाज्यांत पाऊल टाकलं आहे. ये, सुंदरी, धर्मकर्माला दूर झुगारून प्रेमाच्या साम्राज्यांत आपण स्वैरसंचार करूं ये. चल.

निवे०—( त्याचा हात झिडकारून ) मी आपल्याला हात जोडतें, मला इथनं जाऊं द्या. आपलं मला फार भय वाटतं.

चंद्र०—माझं भय ? सुंदरी, प्रेमानं मन कोमल होतं हें तुला माहीत नाहीं का ?

निवे०—मला जाऊं द्या—नाहींतर एकदांची मला ठार करा.

चंद्र०—ठार करूं ? ठीक आहे. उद्यां आपण आनंदानं काळाच्या जबड्यांत प्रवेश करूं. मग तर झालं ना !—पण आज ?..निवेदिते, आज मात्र यौवनाच्या पूर्ण सुखाचा अनुभव घेऊं. ये. चल, खरोखर सांगतों, एवढा वेळ पावेतों तुला बंदिवासांत ठेऊन या अवर्णनीय सौंदर्याच्या उपभोगाची उपेक्षा केल्यामुळें, माझ्या रक्ताचं कढं पाणी होऊन गेलं आहे. ये ये सुंदरी—

अनंगा०—( प्रवेश करून ) कसं पकडलं ? एवढ्याचसाठीं कां पळालांत तिकडनं ?—वेडे कुठले ! चला तुमच्या अभावीं सारा उत्सव कसा स्मशानयात्रे-सारखा भासतो आहे. [ ती त्याला बिलगते, तो झिडकारून दूर होतो. ] हें काय ? आज झालं काय असं हें ?

चंद्र०—जा, तुह्मी सारीजणं उत्सव करा. मला राहूं द्या इथं एकटाच.

अनंगा—ही कोण मेली चोंबडी ?

चंद्र०—माझी पाहुणी आहे.

अनंगा—मग तिलाही आणा ना तिकडेच.

चंद्र०—तुझ्या हुकमानं कांहीं ती इथं आली नाहीं.

अनंगा—पण मी तुमच्याच हुकमानं आलें ना ?

चंद्र—मग माझ्याच हुकमानं इथून निघून जा.

अनंगा—आलें खरी तुमच्या मर्जीसाठीं—पण आतां राहणार इथं माझ्या मर्जीनं.

निवे०—महाराज, कृपा करून मला तुरुंगांत पाठवा.

अनंगा—तुरुंगांत ?—इश्श ! वैष्णवी आहे वाटतं ही ? भारलंन् वाटतं मेलीनं यांना ! अहो भुजंग, कुरंग, या—या लवकर—अग चित्रे—मित्रे, या ग बाई दिवा घेऊन. एकदां हा मुखचंद्र तरी पहा मेलींनो ! ( भुजंग, कुरंग वगैरे येतात. )

भुजंग—काय ग अनंगे, झालं काय एवढं ओरडायला ?

अनंगा—( हंसें आंवरीत ). काय गंमत—अग बाई—काय गंमत—नाहीं सांगतां येत ! मेलं हसूंच आवरत नाहीं मला !—गंमत तर पहा—

भुजंग—कालची पोरटी तूं—काय मजा दाखवणार आहेस आम्हांला ?

अनंगा—आतां बोलायचीच नाहीं मुळीं मी ! कालची पोरटी अं !—मेले थेरडे वानर कुठले !

भुजंग—छे ग बाई ! तुला कालची पोरटी कोण ह्मणेल ? आमच्या आजीची-देखील तूं आजी ! अगदीं वृद्ध—महाभारतकालाइतकी वृद्ध !—झालं ?...आतां गेला राग ?

अनंगा—लाज नाहीं वाटत मला वृद्ध ह्मणायला ? बेशरम !

भुजंग—मोठं लचांड झालं हें ! पोरटी म्हटलं तरी रागावतेस, म्हातारी

म्हटलं तरीही रागावतेस—आतां म्हणावं काय?—हं अस्संच पहा—तूं मुळीं जन्मालाच आली नाहींस—तुला मुळीं जन्मच आला नाहीं. आतां तरी झालं? आतां काय तें झटकन् सांग पाहूं, नाहीं तर तुझ्या गमतीच्या फेसाचं पाणी होऊन जाईल.

अनंगा—ही वैष्णवी—हिः हिः हिः हिः—आतां हंसं कसं आवरूं?—ही वैष्णवी काय म्हणते ऐकलंत?—म्हणते—

भुजंग—म्हणते, अनंगेला तिचा मत्सर वाटूं लागला आहे.

अनंगा—चूप रहा माकडा—म्हणते—( हंसूं लागते )—म्हणते मला तुरुंगांत पाठवा. तुरुंगांत जसे कांहीं गालिचेच अंथरलेले असतात. तुरुंगांत जसा कांहीं मेजवानीचा थाटच उडालेला असतो. आपली निःशंक म्हणते, मला तुरुंगांत पाठवा!

चित्रा—वैष्णवी आहे का ही? पाहूं तरी बाई! मी नव्हती कधीं कुणी वैष्णवी पाहिली!

अनंगा—आणि तिच्यासाठीं हे चंद्रशेखर आम्हांला टाकून इकडे पळून आले. काय मेलं ध्यान! हे विखुरलेले केस, हें पांढरं फटक पातळ, ही गळ्यांतली तुळशीची माळ, हे आकाशाकडे लावलेले डोळे—कोण म्हणेल जशी लावसटच. इश्श! ओकारी आली बाई मला.

चित्रा—तुला ओकारी आली, पण चंद्रशेखर तर विरघळले ना?

भुजंग—भिऊं नकोस बेटे. तुम्हां लोकांना वल्लभांना काय तोटा! तुम्हीं आहांतच तशा हुषार!—

कुरंग—भिऊं नकोस चित्रे, मी होईन तुझा वल्लभ.

भुजंग—वल्लभ नव्हे चित्रे, बल्लभ! चांगला आचारी शोभेल तुला हा!

अनंगा—आहोंच आम्हीं तशा. तशी ही आहे का? काय भाळले हिला! हिला काय गातां येतं? कीं नाचतां येतं?—कीं अंः—मुरके मारतां येतात?

भुजंग—नाहीं बाई, असलं तिला कांहींच येत नाहीं. तुमच्यासारखी ती हुषार नाहीं, एवढंच नव्हे, तर तुमच्यासारख्या जगांत आहेत हें सुद्धां तिला माहीत नसेल. पुरुषांना चटक लावणाऱ्या तुम्हीं तुमच्या पुढं या असल्या भाबड्या पोरीचा काय पाड? तरी पण धर्मकथा बोलायची म्हटली, तर हिचा चेहरा पाहतांच खात्रीनं मरावंसं वाटेल.

अनंग—भेकड दिसते अगदीं ! अगदीं लाकडी पुतळीसारखी. नाहीं एवढासा ढंग कीं नाहीं एवढा रंग.

कुरंग—पण एकंदरींत मुखडा दिसतो अगदीं कोंवळा ! ताज्या काकडी-सारखा.

अनंगा—एवढ्यांतच भाळले का हे राजश्री ?

भुजंग—भाळले कसले ? दोन दिवस जाऊं देत, पायींचा जोडा आठवेल पण हिची आठवण होणार नाहीं.

अनंगा—मला एक शंका येते. हिचा हा वर्ण बराचसा गौर दिसतो. खरा आहे कीं लावलेला आहे ? एकदां पाहूं या अं ! ( तिला हात लावतो. )

चंद्र०—खबरदार तिला हात लावाल तर !

भुजंग—अरे बाप रे ! ज्वालामुखी भडकला ! तरी म्हटलं अजूनपर्यंत गप्प कसा राहिला ? असंच असतं या ज्वालामुखी पर्वताचं.

अनंगा—अशी काय ही ! अगदीं डोळे कां मिटले हिनं ? घोडीसारखी उभ्यानंच झोंप घेते वाटतं ? ( पडद्यांत भजन ) अग बाई ! हें काय ? रडतं आहे कोण हें ? स्मशानयात्रा निघाली आहे वाटतं ? भय वाटतं बाई मला. अहो चंद्रशेखर, गप्प कराल का या रडव्यांना ? बंद करा—आधीं बंद करा.

चंद्र०—काय बंद करूं ? हें संगीत ? अशक्य आहे ! मूर्खांनो, हें संगीत नव्हे. स्वर्गांत देवदैत्यांचं या वेळीं तुमुल रणकंदन चाललं आहे. देवांनीं दैत्यां-वर जय मिळवला आहे, त्यांच्या भेरीचा हा शब्दनिर्घोष आहे.

अनंगा—वेड लागलं कीं काय याना ? देव कुठले ? दैत्य कुठले ?—कांहींच्या-बाहीच बोलताहेत, झालं !

चंद्र०—आम्ही दैत्य आणि ही देवता

अनंगा—ही देवता ना ? ये तर बाई, माझी छबुकडी ती—घे थोडंसं ! थोडंसं अमृत पान कर.

कुरंग—मद्य म्हणजे इहलोकीचं अमृत आहे खरं. नैवेद्य दाखव थोडासा त्या देवतेला.

निवे०—माझ्या बहिणींनो. काय चालवलं आहेत हें ? कशाला हीं ढोंग सोंग ? सत्याचा यांत लवलेश तरी आहे का ? पापाचा आश्रय करून उगीच

नरकाचं साधन कां करतां ? एकवार डोळे उघडून पहा, ज्ञानाचा दिव्य प्रकाश भोंवतींकडे वावरत असतां, काळोखाला हृदयाशीं कां बरं कवटाळतां ?

अनंगा—बाई-बाई-बाई-मेलीचं व्याख्यान ऐका. भारीच वळवळते जिभली. पाहूं बरं ! ( तिची हनुवटी धरते. )

चंद्र०—खबरदार कुणी तिला स्पर्श कराल तर—( तिला दूर लोटतो.)

अनंगा—चांगला गृहस्थपणा हा ! मेलं माणसाला बोलावून आणतात, तें काय असा लाथा खायला ? चांगलीं आमंत्रणं हीं ! आणि ही आमची शोभा कुणासाठीं ?—तर या दगडी हडळीसाठीं ! उभी पहा कशी राहिली आहे सटवी !—काय पण निवड. अहाहा चंद्रशेखर महाराज, तुह्मांला खास वेड लागलं आहे.

चंद्र०—खरोखरच मला वेड लागलं आहे. माझा मेंदू भडकला आहे. देहाच्या प्रत्येक रोमांत आगीच्या ठिणग्या उडत आहेत. मी वेडा झालों ! खरोखर मी वेडा झालों ! जा तुह्मी सारींजणं—इथनं निघून जा. या स्वर्गीय देवतेच्या निःश्वासानं पवित्र झालेल्या या स्थानाला आपल्या कलुषित अस्तित्वानं कलंकित करूं नका. तुमच्या पैशाचिक आनंदोत्सवांत पापाच्या उग्रमूर्तींचं थैमानच मला नुसतं दिसतं आहे. दूर व्हा—दूर व्हा—निघा इथनं.

भुजंग—अगदींच पिसाळला हा ! आतां जावं हेंच बरं. एकदां पाहून तर घेतली. झालं काम ! चला ग साऱ्याजणी.

अनंगा—कसले मेले प्रतिनिधी—माथेफिरू कुठले, थूःत् तुमची ! चला ग.

( जातात )

चंद्र०—पहा निवेदिते, सर्वांना मी पिटाळून लावलं. आतां तरी तूं खूष झालीस ना ?

निवे०—आतां मलाही घालवून द्या !

चंद्र०—तुला घालवून देऊं ? तूं जाशील ह्मणतेस ? हाच का माझ्या अंतःकरणपूर्वक प्रेमाचा मोबदला ? निवेदिते, मीं तुझ्यासाठीं वेडा झालों आहें, त्या वेडाला हें औषध देते आहेस का ? तुला जाऊं देऊं ? छे ! छे ! केव्हांही नाहीं. तूं खरोखर चेटकीण तर नाहींस ? खरोखर तुला जादूटोणा करतां येतो असं वाटतं. तुझ्यासाठीं मीं सर्वांचा आतां नावडता बनलों—आतां तुला इथं राहिलंच पाहिजे.

पवित्रतेच्या या तुझ्या ज्वाळेनं माझं अंतःकरण भस्मीभूत होऊं लागलं आहे. तुला पाहाण्यापूर्वी, तुझा परिचय होण्यापूर्वी, केव्हांही कसलीही इच्छा माझ्या मनांत जागृत झाली नव्हती. निवेदिते, तुला स्पर्श करण्याची माझी इच्छा अनावर होत चालली आहे. तुला स्पर्श करवांच माझ्या सर्वांगाचा भडका उडाला तरी बेहेतर !–त्याही वेदना मी सहन करीन–पण आधीं तुला आपलीशी करीन.

निवे०––नरपशो ! काय बोलतो आहेस हें !

चंद्र०––तुझ्या अपेक्षेमुळें माझ्या अंतःकरणांत पशुत्वाचा संचार होऊं लागला आहे. तुझ्या रूपवन्हींत माझं मनुष्यत्व दग्ध होत चाललं आहे. ( तिचा हात धरतो )

निवे०––अधमा ! सोड माझा हात.

चंद्र०––कोण आहेरे तिकडे–दरवाजांना भक्कम अंगळा घाला. चारी दरवाजे बंद करा. अरे, इकडे ये. हा दिवा मालवून टाक. (रक्षक तसें करतो.)

निवे०––( रक्षकाला ) नका हो मला एकटी टाकून जाऊं. मी तुमच्या पाया पडतें. अहो तुम्हांला आई, बहीण, कन्या कुणीतरी आहे ना ? त्यांची जर अशी अवस्था झाली तर–

चंद्र०––निघून जा इथून म्हणतों ना ? (रक्षक जातो) आतां कुठं पळशील ? आतां कोण मला अडथळा करील ? पहा, आतां तुला मीं सर्वस्वी माझी करून टाकतों.

निवे०––नाहीं, नरपिशाचा, असं कधींही होणार नाहीं. माझी पवित्रता नष्ट करण्याची तुझी छाती नाहीं. माझ्या आत्म्याला कलुषित करण्याचं तुला सामर्थ्यच नाहीं. ज्याच्या चरणीं मी देह–प्राण अर्पण केला आहे–ज्यानं माझा देह–मन–प्राण घडवली आहेत, तोच माझं रक्षण करील. मी त्याच्या चरणीं आत्मार्पण केलं आहे. आतां माझी लाज त्याला आहे. पापिष्टा, भगवद्भक्ताचं अनिष्ट करणारा तूं कोण रे कीटक !

चंद्र०––निवेदिते, तुझ्या लावण्यमय देहलतेचा ताबा मिळवण्याचीच नुसती माझी इच्छा नाहीं. तुझं अंतःकरण मला पाहिजे आहे–मग मी देवीसारखी तुझी पूजा करीन–राजाचं ऐश्वर्य मी तुला देईन–मगधदेशाचा राजमुकुट मी तुझ्या मस्तकीं चढवीन ! निवेदिते, एकवेळ तूं मला आपला म्हण–

निवे०—चांडाळा, मस्तकावर नाचवायचं तुझं ऐश्वर्य म्हणजे आम्हां वैष्णवांच्या पायाखालची धूळ आहे!

चंद्र०—तर मग मी तुला काय देऊं?

निवे०—कृपा करून मला जाऊं द्या. मी तुमच्या पाया पडतें, मला एकदांची इथून जाऊं द्या.

चंद्र०—कुणी कृपा केली पाहिजे तर ती तूंच—सुंदरी, मला एकवार आपला म्हण!

निवे०—भगवतां, रक्षणासाठीं भक्तांनीं तुला हांक का मारली पाहिजे? मग आम्हीं तुझे कसले? हाच का तुझा आपलेपणा?

चंद्र०—निवेदिते, आतां मी तुझा हात धरणारच! पहा, मी अगदीं अधीर झालों आहें. काकुळतीनं तूं जर ऐकत नाहींस, तर बलात्कारानं मी तुला आपलीशी करीन. कोण मला प्रतिबंध करणार? हातीं आलेला अमृताचा घोट मी फेंकून देऊं म्हणतेस? पहा, निबिड अंधःकाराचं आवरण फेकून देऊन ह्या तारका सांगत आहेत, 'या सुंदरीला हृदयाशीं धर!' प्रशांत काळाची गंभीर निःस्तब्धता भेद करीत हजारों रातकिडे आपल्या कर्कश स्वरानं सांगत आहेत, 'या सुंदरीला हृदयाशीं धरून कृतार्थ हो!' रात्रिकालाचा उन्मत्त वायू हाः हाः स्वरानं माझ्या हृदयांतील दाबून ठेवलेल्या विकारवन्हीला फुंकर घालीत सांगतो आहे, 'रमणीचं प्रेम दुर्लभ आहे, सौंदर्यही दुर्लभ आहे. एकांतांत सांपडलेल्या तरुणीला जाऊं देणं म्हणजे नुसता भेकडपणा आहे.' ये—ये—निवेदिते, प्रियतमे, मी अगदीं अधीर झालों आहें.

निवे०—अधीर झालास तसाच बधिरही हो! भगवंता धांव आतां—नको माझा अंत पाहूंस!

चंद्र०—येऊं दे तुझा भगवंत—हा पहा मी—( दचकून ) काय झालं हें? माझं अंतःकरण बधिर झालं! कसलं हें तेज? निवेदिते, काय हें? काय झालं हें! निवेदिते! निवेदिते—

( पडदा पडतो )

# अंक चवथा



## प्रवेश १ ला

( सिंहासनस्थ उग्रचंड, डाव्या बाजूला राणी, पायाजवळ कादंबिनी, आजूबाजूला भालदार, चोपदार वगैरे )

उग्र०—राणी, आजचा वसंतोत्सव किती मजेचा झाला बरं ! मल्लांच्या कुस्त्या, घोड्यांच्या दौडी, वाघांच्या टकरा, तरवारीचे प्रयोग तर फार उत्तम झाले; पण त्यांतल्या त्यांत वैष्णवाना सिंहाच्या तोंडीं देण्याचा खेळ तर फारच मौजेचा झाला ! अजून थोडे वैष्णव राहिले आहेत, त्यांच्या बासलतीची तजवीज अरूर केली पाहिजे. कायरे कर्कोटक, जनावरं तयार ठेवलीं आहेस ना ! सारीं उपाशीं आहेत ना ?

कर्को०—होय महाराज.

उग्र०—फार उमदे सिंह तेवढेच आणले आहेस ना ? एका घासासरशीं एकेक लठ्ठ वैष्णव गट्ट करण्याची त्यांची लायकी आहे ना ?

कर्को०—अशीं जनावरं आणलीं आहेत, कीं मगधदेशांत आजपर्यंत कुणी कधीं पाहिलींच नसतील.

उग्र०—ठीक-ठीक. सायंकाळीं रंगस्थलाच्या चाऱ्ही बाजूला चालत्या मशाली शिलगावून देऊं. एकेक वैष्णवाला बांधून चांगलं तेल चोपडून जळत्या दारूनं पेटवून देऊं. सर्वांना अगदीं एकाच वेळीं शिलगावलं पाहिजे. समजलास ना ?— मागंपुढं मुळींच होतां नये. असं शिलगावशील, कीं प्रत्येकाचं तोंड सर्व प्रेक्षकांना झगझगीत दिसेल.

शार्दूल—( प्रवेश करून ) महाराजांचा जयजयकार असो—महाराजांच्या हुकुमाप्रमाणं चंद्रशेखरांच्या वाड्यांतून त्या वैष्णवीला कैद करून आणलं आहे.

उग्र०—उत्तम-फार उत्तम ! त्या पोरटीची एक सुरेख मशाल बनवून चंद्रशेखराच्या पुढं आणून शिलगाव. चंद्रशेखराला ती जुमानीत नाहीं म्हणे ! आज रात्रीं तिला जाळलीच पाहिजे. तिला कैद केलीस तेव्हां चंद्रशेखर काय म्हणाले ?

शार्दूल—काय म्हणणार ! आम्ही तिथं पोचलों तेव्हां ते त्या वैष्णवीसमोर ओळींत वेड्यासारखे उभे राहिले होते. आम्ही तिला पकडतांच महाराजांवर आणि या दासावर कोपाविष्ट झाले.

उग्र०—काय म्हणतोस ! आमच्यावर कोपाविष्ट झाले ! एवढा उन्मत्तपणा !

शार्दूल—महाराजांनीं याबद्दल त्यांना माफी करावी. तोंडचा घास अशयत्यावेळीं काढून घेतल्यामुळं त्यांना राग येणं साहजिकच आहे. महाराजांवर तसा कांहीं त्यांचा म्हणजे विशेष असा राग नाहीं.

उग्र०—तुमची खात्री आहे अगदीं ? आमच्यावर तो उलटणार नाहीं ना ?

शार्दूल—माझी पूण खात्री आहे महाराज ?

उग्र०—मग कांहीं हरकत नाहीं. छेः छेः शार्दूल, चंद्रशेखरांची आह्मांला फार जरूरी आहे बरं-फार जरूरी आहे. त्यांना उलटूं देणं मुळींच इष्ट नाहीं. बरं, पण त्या वैष्णवीला पकडलं तेव्हां तिनं काय केलं ? खूपच रडूं लागली असेल, काकुळत्या करूं लागली असेल, क्वचित मूर्च्छित देखील पडली असेल, नाहीं ?

शार्दूल—नाहीं महाराज-शांतपणानं नुसतं म्हणाली,—" चला मी तयार आहे ! "

उग्र०—असं म्हणाली म्हणतां ? मोठं आश्चर्य आहे ! काय वेडेपणा आहे तरी ? या वैष्णवांनीं आमची फारच निराशा केली आहे. हे असे शांतपणानं मरायला तयार होतात, त्यामुळे त्यांना मारण्यांत आह्मांला समाधान होत नाहीं. पण आज पाहूं-ही पोरटी आणि तें कारटं मरतांना थोडीतरी धडपड करतील, अशी आह्मांला आशा आहे.

कर्को०—( आंत पाहून ) प्रतिनिधीची स्वारी आली आहे महाराज.

उग्र०—काय म्हणतोस ? चंद्रशेखर ? यावेळीं आले आहेत ? शार्दूल, मघाशीं ते फार रागावले होते ना ? आले आहेत म्हणतोस ? राणी, कसं ? त्यांना येऊं द्यावं का इथं ? नाहीं तर आज नको—उद्यां या म्हणावं.

राणी—नाहीं महाराज ! तसं सांगितलं तर सम्राट आपणांला भीतात, असा त्यांचा गैरसमज होण्याचा संभव आहे.

उग्र—चंद्रशेखराला मी कां भिईन ? कधींही नाहीं ! जा, त्याला घेऊन ये. कर्कोटका, मदिरापात्र घेऊन ये. ( तो आणतो व पेला भरून देतो) नाहीं–आधीं

तूं पी. वीष टाकलं असशील एकादं ! पी असं ! हं ! आण आतां—( पीतो ) राणी, माझ्या मस्तकावरचा हा घाम पूस पाहूं. फार उष्मा होतो आहे.

चंद्र०—[ प्रवेश करून ] मगधेश्वराचा जयजयकार असो.

उग्र०—काय गडबड आहे चंद्रशेखर ?

चंद्र०—मी क्षमा मागण्याकरतां आलों आहें—

उग्र०—क्षमा ? आमचे परमविश्वासू प्रतिनिधी चंद्रशेखर यांच्या हातून मगध देशाची क्षमा मागण्याजोगा अपराध केव्हांही घडणार नाहीं, अशी आमची खात्री आहे.

चंद्र०—क्षमा माझ्यासाठीं नव्हे महाराज.

उग्र०— तर मग कुणासाठीं ?

चंद्र०—एका निरपराधी वैष्णव बालिकेसाठीं.

उग्र०—वैष्णव बालिका ! कुठली ? आज पकडून आणली ती तर नव्हे ?

चंद्र०—होय महाराज.

उग्र०—ती तर मुळींच निरपराधी नाहीं.

चंद्र०—तिनं काय गुन्हा केला आहे महाराज ?

उग्र०—गुन्हा ? तुह्मांला माहीत नाहीं ? ती वैष्णव आहे. बस्स, आणखी काय गुन्हा पाहिजे ?

चंद्र०—कुणी सांगितलं ती वैष्णव आहे ह्मणून ?

उग्र०—या शार्दूलांनीं—तसंच—तसंच—

चंद्र०—कादंबिनी ? असंच कीं नाहीं ? महाराज, मत्सरी स्त्रीचं भाषण कधीं विश्वसनीय असतं का ?

शार्दूल—आणखी पुरावा आहे. वैष्णवांच्या मेळ्यांत या कर्कोटकानं तिला पाहिलं होतं. प्रतिनिधींना माहित आहे.

चंद्र०—शार्दूल, त्यांनीं कोणता अपराध केला होता ? ईश्वराचं नामसंकीर्तन करणं, हा अपराध का ? महाराज, मी शपथपुरःसर सांगतों, कीं सर्व मगध देशांत या वैष्णवांइतकी धार्मिक आणि निरुपद्रवी दुसरी प्रजाच नाहीं.

राणी—आणि ह्मणूनच वाटतं तुह्मी या वैष्णवीच्या प्रेमपाशांत सांपडलांत ?

उग्र०—म्हणे निरुपद्रवी ! या वैष्णवानींच आमचा सत्यनाश केला आहे.

आणखी धार्मिक ! काय करायचा आहे धर्म ! या धर्माच्या अनुशासनानं मनुष्याचं अर्धअधिक सुख गिळून टाकलं आहे.

चंद्र०—आणि अधर्माच्या राक्षसी क्षुधेनं जगांतील सारीच सुखशांती गिळून टाकली आहे.

उग्र०—बस्स–पुरे झालं. आम्ही परमेश्वर आहों. आम्ही कुणाच्याही मताप्रमाणं वागणार नाहीं. आम्हांला वाटेल तें आम्ही करूं. जीवन आणि मरण हीं दोन्ही आमच्या हातांतलीं खेळणीं आहेत. आमच्या इच्छेविरुद्ध कुणीही जगतां किंवा मरतां कामा नये. आमचा निश्चय झाला आहे, तो अभेद्य आहे. इतर वैष्णवांबरोबर निवेदिता मेलीच पाहिजे.

चंद्र०—ऐवानं. मगधेश्वर–मी आजपर्यंत केवळ मगधेश्वराच्या शब्दानंच चाललों आहे. खरा राजनिष्ठ असेल, तर तो एक मीच आहें. मगधेश्वराच्या प्रभावळींत खुषमस्करे पुष्कळ आहेत–पण मित्र असे फार थोडे—

उग्र०—( इकडे तिकडे पाहून) कशावरून ! कशावरून तुम्ही असं म्हणतां !

चंद्र०—जी खरी गोष्ट बोलतांना इतरांची जिव्हा कच खाईल, ती सांगायला या चंद्रशेखराला मुळींच भय वाटत नाहीं. महाराज, या सिंहासनाच्या चौफेर जे कुणी जमलेले आहेत, त्यांतील कुणी स्वार्थसाधू आहेत; कुणी तोंडपुजे आहेत; कुणी गळेकापू आहेत; तर कुणी नुसते भयानंच मगधेश्वरापुढं मान वांकवीत आहेत. पण मगधेश्वराच्या प्रसंगी सहाय्याला धांवून येणारा या चंद्रशेखराखेरीज दुसरा कुणीही नाहीं.

उग्र०—हं–हं चंद्रशेखर, तोंड आटोपून बोला.

चंद्र०—तोंड कां आटोपूं ! मगधेश्वराच्या नुसत्या रागाच्या भीतीनं ! सम्राट, जोंपर्यंत मी या गादीशीं कृतघ्न झालों नाहीं तोंपर्यंत आपल्या असंतोषाला मी केव्हांही पात्र होणार नाहीं. मगधेश्वराच्या हितचिंतकावरच मगधेश्वराचा कोप होईल का ? राणीसाहेब, आपण सांगा, मी मगधेश्वराशीं कृतघ्न होईन असं आपल्याला वाटतं का !

राणी—नाहीं–मला असं कधींही वाटणार नाहीं.

चंद्र०—महाराज, एकवेळ डोळे उघडून पहा, काळाचा घनदाट अंधकार मगध देशाला हळुहळू ग्रास करूं पहातो आहे. या भयंकर अंधकारांत मगधेश्वराला

मार्ग दाखवणारा एक पूर्ण विश्वासू अनुचर असणं अत्यंत अवश्य आहे. असा आत्मत्यागी सहृदय सुहृद आपणाला कायमचा हवा असल्यास त्याचा मोबदला म्हणून या गरीब बिचाऱ्या वैष्णवीला प्राणदान द्या.

उग्र०—याविषयीं राणीचें मत काय आहे ?

राणी—चंद्रशेखरांना वेड तर लागलं नाहीं ! तुमचा देखील वैष्णव बनायचा विचार आहे वाटतं !

चंद्र०—राणीसाहेब, काय सांगावं ! पण या वैष्णवीची पवित्रता पाहून तिच्या मतांबद्दल माझ्या मनांत आदर उत्पन्न झाला आहे खास !

राणी—चंद्रशेखर, या वैष्णवीनं जादूटोणा करून तुह्मांला भारलं खास !

चंद्र०—भारलं खास ! पण तें कशानं ! जादूटोण्यानं नव्हे. राणीसाहेब, मला भारलं तिच्या पवित्रतेनं—मला भारलं तिच्या सरलतेनं—मला पूर्ण वेडा केलं आहे तें तिच्या असामान्य आत्मयज्ञानं.

उग्र० - कांहींही असो—पण ती वैष्णवाची मुलगी आहे.

चंद्र०—असेना कां ती वैष्णव ! तरीही तिला एकवेळ क्षमा कराच ! क्षमा करणं म्हणजे महाराजांच्या तोंडचा नुसता एक शब्द आहे—पण त्या एका शब्दानं मला जगाचं साम्राज्य मिळाल्यासारखं वाटेल. महाराज, कांहींही करा—पण तिला जीवदान द्याच—

उग्र०—केव्हांही नाहीं.

चंद्र०—अभिषप्त हा मगधदेश ! आणि अभिषप्त तिथला राजा ! महाराज, आपण पाहूं शकत नाहीं—समजूं शकत नाहीं—पण मी पहातों आहें. हीं लक्षणं चांगलीं नाहींत. महाराज, जागे व्हा—मी प्रतिज्ञेवर सांगतों, कीं वैष्णवांपासून आपणांला कसलंही भय नाहीं. त्यांचा धर्म त्यांना हिंसा शिकवीत नाहीं. त्यांच्या-वर राजद्रोहाचा आरोप करणं केवळ अप्रयोजक आहे.

राणी—काय ऐकायचं त्यांचं ? एकदां त्यांना शिक्षा दिली ती दिली ! सर्वांना शिक्षा करायची आणि एकाला मात्र यांच्यासाठीं सोडून द्यायचं, हें न्यायाचं होईल का ?

चंद्र०—तर मग तिचं मरण चुकत नाहीं तर ?

राणी—चुकेल—ती जर वैष्णव धर्म टाकून देईल तरच तिला वाचवण्या-साठीं मी महाराजांना आग्रह करीन.

उग्र०—हं-हं—मग तिला आम्ही जीवदान देऊं.

चंद्र०—ती केव्हांही धर्मत्याग करणार नाहीं.

उग्र०—मग खुशाल मरूं दे तिला ! बस्स यापुढं आम्ही एक शब्दही बोलणार नाहीं. ह्याच आमचा शेवटचा हुकुम. राज्ञी, कादंबिनी, चला आतां आपण रंगस्थलाकडे जाऊं. मृत्युदेवतेचं थैमान पहाण्यास उगीच खोळंबा मात्र झाला—चला.

कादं०—ही मी आलेंच ( चंद्रशेखर व कादंबिनी खेरीज सर्व जातात )

चंद्र०—( स्वगत ) निवेदिता धर्मत्याग करील ? निवेदिता धर्मत्याग करील ? कधींही नाहीं—तर मग ? ती मेल्यावांचून गत्यंतर नाहीं—निवेदिता मरणार ! आज मरणार ! नाहीं ती मरतां कामा नये—तिला कशी वांचवूं ! ती तेजस्विनी धर्मपरायण बालिका हांसत हांसत मृत्युमुखांत प्रवेश करील—पण धर्ममार्गांतून तसुभरही हालणार नाहीं. निवेदिता मरणार ! नाहीं—ही कल्पनाच मुळीं भयंकर आहे. समजलों, त्या पापिणीचंच हें सारं कारस्थान—

कादं०—चंद्रशेखर--

चंद्र०—कोण ? कादंबिनी ! तूं अजून इथं आहेस ! झालं ना तुझं समाधान ? निवेदिता मरणार—आज निवेदितेचा खून होईल--

कादं०—बरं होईल.

चंद्र०—कुणाचं बरं होईल ?

कादं०—तुमचं. ती मेल्यावर तरी तुमचे डोळे उघडतील.

चंद्र०—ती मेली तर ? निवेदिता मेली तर ! हा दैवा ! निवेदिता मेली तर, कादंबिनी, चंद्रशेखरही मरेल.

कादं०—भलतंच कांहीं तरी !

चंद्र०—निवेदितेचा मृत्यु म्हणजे साऱ्या विश्वाचा मृत्यु. निवेदिता मेली तर ही पृथ्वी अनंत अंधारांत गडप होईल, सूर्याचं तोंड काळं ठीक्कर पडेल, फुलं फुलणार नाहींत, पक्षी गाणार नाहींत, झुळझुळ वाहणाऱ्या नद्या कोरड्या ठणठणीत होतील—निवेदितेच्या शोकानं आकाश राजातारकारूपी अश्रू गाळूं लागेल, पौर्णिमेचा चंद्र विझून जाईल आणि उषःसुंदरीच्या दिव्य हास्यानं पृथ्वी यापुढं केव्हांही प्रफुल्लित होणार नाहीं.

कादं:०—काय हें वेड ! निवेदिता मेली तर जिवंत आहेत त्यांना काय त्याचं ?

चंद्र:०—निवेदिता मेली तर कुणीही जिवंत रहाणार नाहीं. ऐक, कादंबिनी, निवेदिता मेली तर तिच्या मरणाला कारणीभूत होणारा एकही प्राणी जिवंत रहाणार नाहीं. तूं नाहीं–शार्दूल नाहीं–राणी नाहीं—एवढंच काय, पण खुद्द मगधेश्वर उग्रचंड देखील जिवंत रहाणार नाहींत ! ऐकलंस ?

कादं०:—चंद्रशेखर, तुमचं माथं फिरलं आहे—काय हें वेड ! असली गलिच्छ वैष्णवी तुह्मांला योग्य का ?

चंद्र०:—अगदीं योग्य ! जगाच्या आरंभीं सृष्टिकर्त्यानं असंच विधान करून ठेवलं आहे. नुसती योग्यच काय—पण ती माझी जन्मदात्री आहे. तिच्या संसर्गानं माझं मनोमालिन्य दूर झालं आहे. माझा कलुषित आत्मा पवित्र होऊं लागला आहे. पापाचा तिटकारा उत्पन्न होऊं लागून पुण्यमार्गाकडे माझं मन ओढ घेऊं लागलं आहे—ज्ञानाचा दिव्य प्रकाश हळुहळू मला आपोआप दिसूं लागला आहे ! तिच्या निश्वासाशीं माझा प्राण खिळून राहिला असल्यामुळं ती मेली कीं मी मरणारच.

कादं०:—असंच जर असेल, तर तीही मरूं दे आणि तुम्हीही मरा. तुम्ही मेलांत तरी चालेल पण तिला घेऊन तुम्ही उभयतां जिवंत नांदलेलीं माझ्यानं पहावणार नाहीं. खुशाल मरा दोघेंही—मी डोळेभर पाहीन तुमचं मरण !

चंद्र०:—निवेदिता मरणार नाहीं-तिला मी मरूं देणार नाहीं. उग्रचंडाचा लोखंडी तुरुंग किती मजबूत आहे, त्याच्या पहारेकऱ्यांची शस्त्रं किती प्रखर आहेत, तें तरी पाहूं ! माझ्यापासून निवेदितेची ताटातूट करण्याची शक्ती जगांतल्या कोणत्याही–केवढयाही बलवान व्यक्तीच्या अंगीं नाहीं. जा,–विश्वासघातकी स्त्रिये, तुझ्या मगधेश्वराला हाच माझा निरोप सांग. ( जातो. )

कादं०—कसलीही आशा आतां राहिली नाहीं, मग मायाममता कशासाठीं धरायची ? जीव तोडून प्रेम केलं, तें प्रेमच ज्यानं तोडून टाकलं, त्याची कसली माया आणि कसली ममता ! चंद्रशेखरा ! निवेदिता ही मरणारच आणि तिच्याबरोबर तुझंही मरण ठरलंच म्हणून समज. ही आतां जाते आणि सर्व हकिकत सांगून राजाकडून तुझ्याही मरणाचा हुकूम मिळवतें.

( जाते )

## प्रवेश दुसरा

[ निवेदिता, निर्माल्य व कर्नाटक ]

**कर्ना०**—आतां आली तुझी पाळी! कुठं आहे तुझा चंद्रशेखर? इतक्या वेळां चुकवलंस, पण आज तुला कोण वांचवतो तें पाहूं! अरे ए पोरा, त्या दिवशीं घिरटींतून निसटलास पण सिंहाच्या जबड्यांतून आतां कसा निसटणार आहेस? सिंह पाहिला आहेस कधीं? नाहीं? आज पहायला मिळेल.

**निर्माल्य**—ताई, ताई! मला सिंहाच्या तोंडीं देणार का ग?

**कर्ना०**—अरे--अरे—पोर कांपूं लागलं!

**निवे०**—नारायणा, धैर्य दे—या आणीबाणीच्या प्रसंगीं धैर्यच्युत होऊं देऊं नकोस. तुझ्या पदकमलाचं चिंतन करीत हास्यमुखानं मृत्युमुखांत प्रवेश करून आम्हांला अमर होऊं दे! भगवंता, नृसिंहस्वरूप धारण करून प्रल्हादाचं रक्षण केलंस तसंच या माझ्या निर्माल्याला सिंहाच्या ठायीं तुझं गोजिरवाणं सांवळं स्वरूप दिसून येऊं दे. हें पोर अजाण आहे. याला धीर दे. बाळ निर्माल्य, असा कांपतोस कां? असा रडतोस कां?

**निर्माल्य**—ताई—खरोखरच मला सिंहाच्या तोंडी देतील का ग?

**निवे०**—देतील–मग काय त्याचं?

**निर्माल्य**—असं काय म्हणतेस ताई—मला मरणाचं फार भय वाटतं. हें सारं जग असंच असणार आणि मी मात्र नाहींसा होणार? असं कसं होईल ताई? हें काय? तूं रडत कां नाहींस? अशी काय ही तुझी मुद्रा? मला भय वाटतं ताई! ताई, सांग ग, ही सुंदर पृथ्वी मला पुन्हां दिसणार नाहीं का ग?

**निवे०**—ही पृथ्वी काय आहे? अशा कोटीशः सुंदर पृथ्वी एकत्र केल्या तरी ज्याची सरी पावणार नाहींत, अशा वैकुंठांत तुझी वसती होईल! बाळ निर्माल्य, त्या जागीं दुःख नाहीं, क्लेश नाहींत, काळोखाचं तिथं नांव सुद्धां नाहीं, मगधेश्वर उग्रचंडाचा तिथं कधीं प्रवेश सुद्धां व्हायचा नाहीं. तिथं आनंदाचं साम्राज्य आहे, सुख आणि शांति यांचं तें चिरंतन वसतिस्थान आहे–आणि भगवान श्रीकृष्ण चारी बाहू पसरून तिथं आगंतुक भक्तांची निरंतर वाट पहात बसलेले आहेत.

**निर्माल्य**—पण ताई, मरते वेळच्या यातनांचं मला भय वाटतं ताई!

निवे०—यातना ! हा वेड्या, तप्त तेलाच्या कढईंत, हत्तीच्या पायाखालीं, गिरीशिखराच्या दरविरून धडधड कोसळतांना प्रल्हादला यातना झाल्या नव्हत्या का ? बाळ निर्माल्य, तुला प्रल्हादाची कथा माहीत आहे ना ? प्रल्हाद तुझ्या-हूनही लहान होता पण त्याची निष्ठा केवढी मोठी ! त्याची श्रद्धा किती अढळ होती ! त्याचं स्मरण कर, त्या बाळाचं चरित्र आठव म्हणजे तुझं भय नाहींसं होईल बरं बाळ ! भयंकर मृत्यू आपले विशाल बाहू पसरून त्यावेळीं तुझ्या पुढं धांवत येईल त्यावेळीं अजामिळाप्रमाणें नामाचा घोष कर म्हणजे विष्णु-दूत धांवत येऊन त्याच्या जबड्यांतून सोडवून तुला वैकुंठाला घेऊन जातील.

निर्माल्य—पण ताई ! माझ्या विश्वासघातकी वर्तनाची काय वाट ? त्या पापांतून मी कसा मुक्त होईन ?

निवे०—तूं विश्वासघात कुठं केला आहेस ? बुद्धिपुरःसर तें कृत्य तुझ्या हातून घडलं नाहीं. दुबळ्या नाजुक देहाला होणाऱ्या भयंकर यातना असह्य होऊन तुझं तोंड भलती गोष्ट बोलून गेलं, त्याचं प्रायश्चित देह भोगील. त्याचं तुला काय आहे ? तुझा आत्मा पापशून्य आहे—पूर्णपणें निर्मल आहे.

निर्माल्य—पण ताई, अजून मला भय वाटतं ? तुला कांहींच भीति वाटत नाहीं कशी ?

निवे०—ही निर्भयता माझी नव्हे. बाळ, सारं साहस—सारी शक्ति—मनाचा सारा जोर—त्यानं मला दिला आहे. तो कल्पवृक्ष आहे—वाटेल तेव्हां मागाल तें देतो आहे. जो मागत नाहीं त्याला काय देईल ? माग बाळ, त्याच्यापाशीं धैर्य माग—मग भीतीचं भय तुला मुळींच वाटणार नाहीं.

निर्माल्य—नाहीं—नाहीं—ताई—वांचीव ग मला—

निवे०—हा वेड्या ! एवढं सांगूनही नाहीं कळत—तूं माझा असातसा का भाऊ आहेस ? माझा प्राण तूं—माझा गर्व तूं—माझा अभिमान तूं—माझं सर्व कांहीं पौरुषेय तूंच आहेस. माझ्या इष्टदेवतेच्या चरणावरचं तूं निर्माल्य आहेस. ये बाळ, तुझं मी अवघ्राण करतें. ये—माझ्या हृदयाशीं ये. माझ्या हृदयाला हृदय जखडून टाक. माझ्या साहसानं साहसी हो—माझं साहस तर माझं नव्हे ना ? त्याचंच ना ? त्याच महासाहसाचा आश्रय करून वैकुंठांत प्रवेश करूं.

**निर्माल्य**—नाहीं ताई, माझ्या हृदयाची धडधड थांबत नाहीं. ताई, हा दुबळेपणा कुणाचा ! देहाचा किं मनाचा !

**निवे०**-कुणाचा कां असेना ! टाक तो दुबळेपणा. म्हण बाळ 'जय श्रीकृष्ण. बाळा, तुला माझी शपथ आहे, मरतांना भिऊं नकोस. माझ्यावर तुझं प्रेम आहे, असंच तूं सदोदित म्हणतोस ना ! त्या प्रेमाची तुला शपथ आहे. यच्चयावत् भूतमात्रांवरील भगवंताच्या प्रेमाची तुला शपथ आहे. श्रद्धा ढळूं देऊं नकोस. मरतांना भीणार नाहीं अशी माझ्यासमोर प्रतिज्ञा कर. तो पहा सिंह. बाळा, हेंच स्वरूप पाहून प्रल्हादाला आनंदाश्रू आले होते. पहा, त्यानं तोंड उघडलं आहे. पहा, हे वैकुंठाचे दरवाजे उघडले आहेत. ते पहा—भगवंताचे पसरलेले बाहु तुला पोटाशीं धरण्याकरितां उत्सुक झाले आहेत. प्रवेश कर—धांव—प्रवेश कर—नाहींतर दरवाजे बंद होतील.

**निर्माल्य**—काय म्हणतेस ताई ! हेंच तें वैकुंठ ! अहाहा ! किती गोड—किती सुंदर ! दिसले—दिसले—मला भगवंताचे हात दिसले ! चल—चल ताई—तूंही ये. आलों—आलों—थांब—जय श्रीकृष्ण ! ( सिंहाच्या तोंडांत उडी घेतो. )

**निवे०**—जय श्रीकृष्ण—जय श्रीकृष्ण ! भगवन् , आतां विलंब कां ! सोड माझी बंधनं. मला जाऊं द्या लवकर. माझा भाऊ पुढं गेला, त्याला कुणी सोबत नको का ? सोडा—सोडा मला—आतां किती वाट पाहूं नाथ !

**चंद्र०**—( प्र. क. ) निवेदिते—निवेदिते—कोण आहे तिथं. चला तो पिंजर घेऊन इथनं-( कर्नाटक वगैरे पिंजरा घेऊन जातात ) निवेदिते—

**निवे०**—( न बघतां ) कोण तें ?

**चंद्र०**—डोळे उघडून पहा ! मी आलों आहें.

**निवे०**—कोण ? चंद्रशेखर ! तुम्हीं इथं कां ?

**चंद्र०**—तुला वांचवण्यासाठीं.

**निवे०**—मला वांचवणार ? कुणापासून ?

**चंद्र०**—मृत्युच्या जबड्यांतून—

**निवे०**—कशा प्रकारानं ?

**चंद्र०**—मी तुझ्यासाठीं मगधेश्वराची माफी मिळवली आहे.

**निवे०**—माफी मिळवली आहे?

चंद्र०—एका अटीवर माफी मिळवली आहे !

निवे०—कोणत्या अटीवर ?

चंद्र०—कीं तूं—तूं—

निवे०—बोला ना काय तें—

चंद्र०—कीं तूं असत्य उपासनेचा त्याग करून—

निवे०—असत्य उपासना ? गीता असत्य काय ? भागवत असत्य काय ? वैष्णव धर्म जर असत्य म्हटला तर जगतांत सत्य तें काय राहिलं ? सत्य—अनंत-अविनश्वर—चिरस्थाई धर्म—

चंद्र०—चिरस्थाई ? या जगांत चिरस्थाई काय आहे ? आणि या जगांत जें नश्वर तें सर्वच नश्वर ! कारण परलोकवास आहे कुठं ? परलोक म्हणजे भाबड्या लोकांना भेडसावण्याचं एक काल्पनिक बाहुलं आहे. जें कांहीं आहे तें इथंच आहे. दोन दिवसांचा गमतीचा खेळ खेळतांच सर्व कांहीं संपतं. मनुष्य आला, हंसला, रडला, धडपडला, शेवटीं झोंपी गेला तो गेलाच!

निवे०—अशी खात्री आहे का ? आपल्या अंतरात्म्याला एकवार विचारून पहा, एक क्षणभर विवेकाची सल्ला घ्या, तोंच सांगेल—परलोक आहे. हें जुनं वस्त्र टाकतांच नवं घेतलं पाहिजे यांत शंका नाहीं.

चंद्र०—जीवनाच्या अंतीं जीवन आहे ? निवेदिते, हें खरं आहे का ? तें जीवन या जीवनापेक्षां अधिक आनंदमय आहे का ?

निवे०—होय ! चंद्रशेखर, तें जीवन निरवच्छिन्न आनंदाचं माहेरघर आहे. असलं जीवन मिळावं असं तुम्हांला नाहीं का वाटत ?

चंद्र०—कां वाटूं नये ? निवेदिते, तूं माझी जन्मदात्री आहेस. तुझ्या पवित्रतेच्या ज्योतिर्मय प्रकाशानं मला माझ्या जीवनांतील भेसूर पापं दिसून आलीं. निवेदिते, ही अलौकिक ज्योति तुला कुठून मिळाली ?

निवे०—ज्योति म्हणून जर कांहीं प्रत्यक्ष तुम्हांला दिसत असेल, तर ती माझी नसून माझ्या नारायणाची आहे.

चंद्र०—मला नारायण नको आहे—

निवे०—तर काय पाहिजे ?

चंद्र०—काय पाहिजे ? पाहिजे सुख—पाहिजे आनंद—तृप्ति पाहिजे.

**निवे०**—जें पाहिजे तें कधीं मिळालं आहे का ?

**चंद्र०**—निरवच्छिन्न आनंद मिळत नाहीं खरा, पण कांहींतरी मिळाल्या-शिवाय इच्छाशक्तीला चैतन्य येईल का ?

**निवे०**:—तुमची इच्छाशक्ति काय मागते ?

**चंद्र०**:—काय मागते ? तूं विचारावंस का हें ? निवेदिते, तूं माझं सुख—तूं माझा आनंद—तूंच माझी तृप्ति. तूं मिळालीस कीं मी पूर्ण तृप्त झालोंच.

**निवे०**:—मी म्हणजे हा देह ! हा देहच तुह्मांला पाहिजे आहे ना ? या देहा-वर तुमचाही अधिकार नाहीं—माझाही नाहीं. या देहाचा मालक मृत्यू आहे. तो वाटेल तेव्हां—मला न कळतां—तुम्हांला न कळतां—आपली वस्तू आपण घेऊन जाईल ! मग असली परावी वस्तू घेण्यांत काय अर्थ ?

**चंद्र०**:—काय उत्तर देऊं याचं ?

**निवे०**:—कांहींच देऊं नका. माझं सुख पाहून तुम्हांला सुख होतं म्हणतां, तें सुख माझ्या सुखांत आहे कीं तुमच्या मनांत आहे, एवढंच शोधून पहा. माझ्या सुखावर तुम्हीं आपल्या सुखाचं प्रतिबिंब पहात असतां, एवढं आधीं आपलं मन ओळखा म्हणजे क्रमानं आपोआप आत्म्याची ओळख पटेल. आणि शेवटीं एकट्या निवेदितेचं काय—पण प्रत्येक भूतमात्राचं सुख पाहून तुम्हांला आनंद वाटूं लागेल. पाप—पुण्य तरी तुम्हीं मानतां ना ?

**चंद्र०**—पाप म्हणजे काय आणि पुण्य काय, हें मला माहीतही नाहीं आणि कळून घेण्याची मी कधीं इच्छाही केली नाहीं—पण एवढंच मला कळतं आहे, कीं तूं जी आहेस तो मी नाहीं. पापपुण्य म्हणून जर कांहीं असेल तर एवढंच सांगूं शकेन, कीं मी म्हणजे पाप—तूं म्हणजे पुण्य ! पुण्याची आवड मला उत्पन्न झाली आहे आणि म्हणूनच माझं तुझ्यावर प्रेम. खरोखर निवेदिते, माझं सारं प्रेम एका तुझ्यावर आहे.

**निवे०**—असं पूर्वी एकवेळां तुह्मीं ह्मटलं होतं. नुसतं ह्मणूनच न रहातां प्रतारणा करून आपल्या बरोबरच माझाही सत्यनाश करायला तुह्मीं प्रवृत्त झालां होतां. तेंच ना तें प्रेम ?

**चंद्र०**—मी अपराध कबूल करतों. त्यावेळीं मी अंध होतों. विकारवशतेचं पटल माझ्या डोळ्यावर आलं होतं. त्यावेळचं प्रेम उद्दाम होतं—आज तें निर्मल

झालं आहे. वाटेल तर माझं हृदय चिरून पहा, तें निष्पाप असल्याचंच तुला दिसून येईल. निवेदिते, कृपा कर—माझ्यासाठीं तरी तूं मरणाला प्रवृत्त होऊं नकोस! माझा मनुष्य जन्म सार्थक कर. निवेदिते, माझी धर्मपत्नी होऊन—

निवे०—धर्मपत्नी ? तुमची विवाहित स्त्री ?

चंद्र०:—होय म्हण–होय म्हण–निवेदिते, होय म्हण–होय म्हण ! निवेदिते, होय म्हण. माझी धर्मपत्नी, माझी विवाहिता स्त्री, माझ्या हृदयाची अधिष्ठात्री देवी हो.

निवे० —चंद्रशेखर–( स्वगत ) भगवंता, या मोहांत मला पडूं देऊं नकोस.

चंद्र०:—अहाहा ! मी धन्य झालों.

निवे०:—चंद्रशेखर, तनु आणि मन मी ईश्वराला वाहिलं आहे. माझ्यावर माझी सत्ता नाहीं. दुसऱ्याची वस्तू मी तुम्हांला कशी देऊं ?

चंद्र०:—निवेदिते, नको ग अशी निष्ठुर होऊंस. धर्मपत्नी नाहीं–तर निदान एवढं तरी कर. तूं आपण होऊन मृत्युमुखीं उडी घेऊं नकोस. धर्मत्याग तरी कर. पुन्हां एकवेळ विचार कर आणि मग—

निवे०:—विचार करण्याची जरूरीच नाहीं. श्वासोच्छ्वास करण्यासाठीं विचार करावा लागतो का ? आपण कांहींच विचार न करतां धमन्यांतून रक्त वहात असतं—हृत्पिंडाची क्रिया सुरू असते. त्याचप्रमाणं जगदीश्वरानं मला घडवलं आहे. तशीच मी राहणार. त्याची भक्ति हा माझा श्वासोच्छ्वास आहे. त्याचं नामसंकीर्तन ही माझ्या हृत्पिंडाची क्रिया आहे. त्याची सेवा हेंच माझं चलनवलन आहे. त्याच्यावरची निष्ठा अढळ राखण्यासाठीं मला विचार करावा लागत नाहीं. त्यान जशी मला घडवली आहे तशीच मी आहें. त्यांत बदल करणं माझ्या शक्तीपलीकडचं आहे.

चंद्र०—अहाहा ! तुझं माझ्यावर प्रेम असतं तर ! अहाहा !

निवे०—ऐका —चंद्रशेखर, मर्त्य लोक माझ्यापासून आतां दूर पळतो आहे. मोहममतेचीं माझीं सर्व स्थानं आतां नाहींशीं झाली आहेत. आतां माझं असं कांहीं जर राहिलं असेल तर ते एक तुम्हींच आहांत.

चंद्र०—खरोखर निवेदिते—

निवे०—पण मी आजन्म भगवंताच्या चरणांच्या दासी आहें. सर्व भूतमात्रं माझी आहेत तशीच मीही त्यांचीच आहें.

चंद्र०—निवेदिते, मी समजलों. तुझा म्हणून घेतल्यांचून राहवत नव्हतं, तूं मला आपला म्हटलंस, एवढंच मला पुरे झालं. कांहींही म्हण पण तूं मरणाला प्रवृत्त होऊं नकोस. सर्वत्र माझं वजन आहे, मी बलवान आहें, ऐश्वर्यवान आहें. या बळाच्या जोरावर मी सर्व भूमी पादाक्रांत करीन. उग्रचंडाला स्थानभ्रष्ट करून मगधेश्वर होईन. तूं मगधेश्वरी व्हायला तयार हो. मगध देशच काय, पण तुझ्या प्रेमाचं पाठबळ मिळालं तर सर्व पृथ्वी उलथून टाकीन आणि सार्वभौमपदाचा महा मूल्यवान स्वर्णमुकुट तुझ्या मस्तकीं धारण करीन!—पण तूं मरणाला तयार होऊं नकोस.

निवे०—मला आवडेल असा स्वर्णमुकुट या लोकीं तर नाहींच. माझा मुकूट म्हणजे भगवंताची पदधूली.

चंद्र०—काय हा विश्वास ? निवेदिते, तुला पाहिल्यापासून मला भयंकर यातना सुरू झाल्या आहेत. निस्तब्ध रात्रीच्या वेळीं सर्व जग जेव्हां सुषुप्तीच्या अंकावर विश्राम घेत असतं, तेव्हां कोटिशः अद्भुत अशरीरी प्राणी माझ्या अंतरंगांत प्रवेश करून कसलंसं भयंकर तुमुल युद्ध माजवित असतात. वैचित्र्यपूर्ण आशेनं माझा देह आणि मन यांना सारखा कंप सुटत असतो. तुझ्या देवाची मी अनेकवार निंदा केली आहे—पण ज्याच्यावरील निष्ठेनं तुझ्या ठायीं हें असीम साहस, ही मरणाविषयींची निर्भयता, हें अद्वितीय तेज आणि हें अलौकिक विकारशून्य प्रेम उत्पन्न झालं, त्या तुझ्या इष्टदेवतेजवळ माझं मन ओढूं लागतं. मृत्यूचा आनंद ? निवेदिते, सांग मला-या रहस्याचा अर्थ काय ? या तत्वाची मीमांसा कुठं आहे ? काय केलं असतां मी तुझ्यासारखा होईन ?

निवे०—सर्वत्यागी होऊन माझ्याबरोबर या आणि श्रीकृष्णचरणाचा आश्रय करून अमर व्हा. घनघोर युद्धाच्या कोलाहलांत ज्यानं अर्जुनाला शांतपणानं ब्रह्मविद्येचा उपदेश केला, तोच जगद्गुरू प्रत्यक्ष होऊन तुम्हांला कृतार्थ करील.

चंद्र०—मी महापापी आहें. मला त्याच्या चरणाशीं स्थान कसं मिळेल ?

निवे०—जवळ येणाराला कवटाळण्यासाठीं त्याचे बाहू सदा पसरलेले आहेत.

कर्ना०—(प्र. क.) प्रतिनिधी महाराज, वेळ भरत आली. आतां बस करा आणि काय तो निकाल सांगा. ही स्त्री वैष्णवधर्म टाकायला तयार आहे की मरायला तयार आहे ?

चंद्र०—निवेदिते, उत्तर काय देऊं ?

निवे०—माझं जीवन नारायणाच्या चरणीं वाहिलेलं आहे. चला.

चंद्र०—थांब—थांब—निवेदिते, काय ही माझी दशा केलीस ! तुला विसरणं शक्य नाहीं—तुला सोडून जाणं शक्य नाहीं. निवेदिते, प्रेमाच्या रज्जूनं मी तुला जखडला गेलों आहें.

निवे०—तुमचं माझ्यावर प्रेम आहे ना ? तर मग ज्याच्यावर माझं प्रेम आहे त्याच्यावरही प्रेम करा. दूर व्हा, मला जाऊं द्या आतां—

चंद्र०—तुला एकटीला मी जाऊं देणार नाहीं. पापपुण्य कांहींही असो— इहकाल, परकाल काहींही असोत—शाक्त—वैष्णव कांहींही असोत—कशांत माझं कल्याण आहे तें मला कळत नाहीं. मला कळतं एवढंच, कीं तूं मला पाहिजेस ! तुला सोडून मी क्षणभरही जगणार नाहीं. निवेदिते, माझा हात धर. ज्या सौंदर्यसागरांत बुडी मारण्यांत तुला एवढी तृप्ती वाटते, तिथं मलाही ने. जिवंतपणी जें पूर्ण झालं नाहीं, तें मृत्यूनं तरी होवो ! चला.

निवे०—धरा हा हात ह्मणा " जय श्रीकृष्ण. "

चंद्र०—तुझी वाणी मला दे. तुझा विश्वास मला दे. मला आपलासा करून टाक. धिक् ही पृथ्वी—धिक् इथलीं सुखदुःखं—धिक् हें ऐश्वर्य—धिक् उग्रचंड आणि धिक्कार असो या मगध देशाला ! तूं माझं पुण्य—तूं माझा धर्म—तूं माझा आनंद— तूं माझी तृप्ती—तूंच माझा श्रीकृष्ण. जा कर्नाटका—मगधेश्वराला सांग, कीं आजपासून चंद्रशेखरही वैष्णव झाला.

शार्दूल—( प्र. क. ) मगधेश्वराच्या हुकमानं—चंद्रशेखर, तूं माझा कैदी आहेस. ही पहा राजाज्ञा.

[ पडदा पडतो ]

---

# अंक पांचवा



## प्रवेश पहिला

[ एका बाजूनें भुजंग व दुसऱ्या बाजूनें अनंगा प्रवेश करते. ]

**भुजंग**—अरे वाः ! ही तर आपली अनंगा देवी ! अरे वाः ! कुरंगा, तूं बरोबर आहेस ना ? ठीक आहे–ठीक आहे. या पदपल्लवांना इतकी कोमेजवीत देवींची स्वारी चालली कुणीकडे ?

**अनंगा**—म्हणजे ! तुम्ही नाहीं कां येत रंगस्थळावर ?

**भुजंग**—कांहीं खात्रीनं सांगतां येत नाहीं.

**अनंगा**—कां बरं ?

**भुजंग**—मी पडलों असला भंगट प्राणी. जिवंत माणसं उभी जाळतांना पाहण्याइतकी रसिकता माझ्याठायीं आहे का ?

**अनंगा**—म्हातारे होता होतां बायकाहूनही भेकड होत चाललांत अगदीं.

**भुजंग**—बायकांहून भेकड ! धर्मकथा बोलायची तर 'नाहीं' असंच म्हणावं लागेल. एवढं तरी धैर्य कुठं आहे मला ? आतां त्या पूर्वींच्या नाजुक-साजुक बायका आहेत कुठं ? पुरुषानं डोळे वटारतांच मातींत तोंड खुपसून आसवांनीं जमीन भिजवणाऱ्या बायका आता आहेत कुठं ! हल्लींची बायको म्हणजे एक मूर्तिमंत जरासंध ! एकेक बायको म्हणजे कडक दांताची घिरटच जशी कांहीं ! सारं बदलून गेलं आहे–बाई, सारं बदलून गेलं आहे ! मर्दाची झाली आहे मादी आणि मादीचे झाले आहेत मर्दमहाराज. पूर्वी पुरुषांच्या मागनं बायका म्याउं म्याऊं करीत हिंडत असत; पण आतां–हेंच पहाना–हा कुरंग पहा–तुझ्या मागनं तुझ्या पैठणीच्या सोग्यासारखा लुडबुडतो आहे. अलिकडे पुरुषांचं हृदय दुसऱ्याचं दुःख पाहून थोडं तरी द्रवतं, पण या बायकोमहाराज नाटकांतल्या नायिकेची उपनायकांकडनं होत असलेली विटंबना पाहून आकर्ण दांताड वासून निर्लज्यासारख्या हसूं लागतात. या दुःखामुळंच, माझे आई, भ्रूभंग टाकून मी नुसती भांगच पकडली आहे.

**अनंगा**—काय वाटेल तें म्हणा, पण मला वाटतं, पुरुषांची जातच मुळीं स्त्रीदास्यासाठीं उत्पन्न झाली आहे.

**भुजंग**—या–या–या बेट्यावर सोड ते वाग्बाण–हा बेटा कुरंग जसा एक कुत्रा–तशीच तूं एक परम पवित्रा. असले हे बैल स्त्रीरुपी सारंगेची गोणी वाहण्याकरतांच बेटे जन्माला येतात. अहाहा ! पहा तरी बेट्याचे डोळे–कसे डुलुडुलू हलताहेत. कुणी ह्मणेल आई नसतं पोरकं पोरच एकादं. अस पहा अनंगे, एक मऊशी रेशमी काढणी आण आणि या बैलाच्या गळ्याला अडकवून त्याला गांवभर हिंडीव.

**कुरंग**—काय वेड्यासारखा बडबडतोस ?—स्त्रीजात म्हणजे अबला–त्यांना सहाय्य नको का करायला ?

**भुजंग**०—अबला ! स्त्री अबला ! आणि हरामखोरा तूं कोण आहेस ? अबलाच कुणी असेल तर–गाढवा, तो एक तूंच–आणि दुसरा मी ! तुझं सारं बुद्धिबल काय तें बायकांच्या खोपरींत भरलेलं–आणि माझं या भांगेच्या लोट्यांत.

**अनंगा**:—तुम्ही बाई भारीच कठोर बोलतां. आणि ह्मणूनच मला वाटतं अजून कुठलीही स्त्री तुम्हांला भाळली नाहीं.

**भुजंग**:—असंच कांहीं नव्हे. हल्लीं पैसा असला कीं बायका प्रेतालासुद्धां माळ घालतात. साऱ्याच कांहीं तशा असतात असं नाहीं. एकादी निवेदिता निघतेच–भांगेतल्या तुळशीसारखी. आहे खरी ती एक चीज. पैसाच काय—पण नवखंड पृथ्वीचं राज्य दिलं तरी कुणाला सावलीसुद्धां येऊं देणार नाहीं. आणि असली दिवटी आज मालवणार ह्मणे ! अनंगे, तूं देखील तिला पकडून द्यायच्या कटांत होतीस ना ? थूत् तुझी !

**अनंगा**:—कां असूं नये ? दुसऱ्याच्या मार्गांत तिनं काट्यासारखं का आडवं यावं ?

**भुजंग**:—अरे बापरे ! कुणाच्या मार्गांत कांटा झाली ती ?

**अनंगा**:—देवी कादंबिनीच्या. मग नको का मी तिला मदत करायला ? बायकांनीं बायकांना मदत करायची नाहीं तर करायची कुणी ?

**भुजंग**:—करावी-करावी–अवश्य करावी. पण बाई, एका बायकोला मदत करतांना दुसरी जिवे मारली जाते आहे, तिला कुठल्या बायकोच्या जातीनं मदत करावी ?

अनंगाः—भंगट कुठले? चला कुरंग, या भंगटाच्या नादीं लागून वेळ मात्र फुकट गमावला. तिकडे केवढी गर्दी झाली असेल एव्हाना!

कुरंगः—हं—हं—चल, चल. येतों बरं, भुजंग. थांब—थांब—अनंगे, हें पहा तुझ्या डोकीतलं गुलाबाचं फुल पडलं आहे—हें धर आधीं.

भुजंगः—दे—बेट्या—दे. कधीं आईबापांची सेवा केली नाहींस, तें पाप आतां या वेसवेची सेवा करून धुऊन टाक. (कुरंग व अनंगा जातात.) अरेच्या, हें दुसरं काय लचांड? (कर्कोटकाला खेंचित शार्दूल, कर्नाटक व शिपाई येतात.)

शार्दूलः—आणा हरामखोराला असा पुढं.

कर्कोटकः—पायां पडतों, मला मारूं नका. मी शपथ घेऊन सांगतों, मी वैष्णव—

शार्दूलः—तूं वैष्णव असलाच पाहिजेस. या कर्नाटकानं हजारों वेळां तुला वैष्णवगोटांत पाहिलं आहे.

कर्को:०—मी हेर होऊन जात होतों, महाराज! सर्व मला ओळखतात. चौकशी करा हवी तर. मला सोडून द्या महाराज. किती वैष्णवांना मी मृत्युमुखीं पाठवलं आहे म्हणून सांगूं!

शार्दूलः—त्यांना मृत्युमुखीं पाठवले असशील पण आतां तुझीच मृत्युमुखीं जायची पाळी आली आहे. दुसऱ्याला मृत्युमुखांत पाठवण्याची गंमत स्वतः मृत्युमुखीं गेल्यावांचून कशी कळेल!

कर्कोः—कृपा करा शार्दुलमहाराज, हा कर्नाटक अगदीं निवळ खोटं बोलतो आहे. हा माझं कांहीं कर्ज देणं होता; मी ते पैसे देण्याविषयीं याला तगादा लावला, त्याचं उसनं फेडूं पाहतो आहे. अगदीं अस्खलित खोटं बोलतो आहे महाराज! मला सोडून द्या महाराज. सूर्य अस्ताला जायच्यापूर्वी शंभर वैष्णव मी पकडून देतों महाराज. पाया पडतों महाराज—मला सोडून द्या. या कर्नाटकाला देखील वाटेल तर वैष्णव ठरवतों महाराज.

शार्दूलः—गप्प बैस हरामखोरा. थोड्या वेळांत तूं मला देखील वैष्णव ठरवण्याची प्रतिज्ञा करशील. तुला सिंहाच्या तोंडीं दिलंच पाहिजे.

कर्कोः—क्षमा करा—क्षमा करा—महाराज. सिंहाच्या तोंडी मी अजून कधींच गेलों नाहीं. मला वांचवा, महाराज. पाया पडतों महाराज.

शार्दूल:—चला. याला घेऊन जा इथनं एकदम.

कर्को:—हे पहा–हे पहा–भुजंगराव, तुम्हीं तरी मला ओळखतां ना ? निवेदितेला मी कसं पकडलं ? तुह्मीं पाहिलं होतं ना ? आणि तो थेरडा ? त्यावेळीं अनंगा देवी पण तुमच्या बरोबर होती. आठवतं ना ?

भुजंग:—असेल–असेल–पाहिलं असेल ! मग आतां काय त्याचं ?

कर्को:—माझ्यासाठीं दोन शब्द टाका–अगदीं दोनच शब्द. पाया पडतों–मी सज्जन माणूस आहें, एवढंच यांना सांगा. पाया पडतों बघा.

भुजंग:—फार सज्जन माणूस आहेस ! या भांगेची शपथ–तूं भारीच सज्जन माणूस आहेस. अहो शार्दूलराज, ऐकलंत, हा फारच सज्जन माणूस आहे. सांगतो आहे दोन शब्द बोलायला–तेव्हां बोलणं भागच आलं. ऐकलंत ? पहा माझ्यावर फार उपकार होतील–माझ्यावर कां साऱ्या देशावर–देशावरच कां साऱ्या जगावर–महाराजांवर–चंद्रशेखरांवर–तुमच्यावर देखील फार उपकार होतील. या बेट्या मुडदेफरासाला झटपट–ऐकतां ? झटपट–झटपट सिंहाच्या तोंडीं द्या. जितका लवकर द्याल तितका बरं ! ऐकलंत ? थोडासा भूभार तरी हलका होईल. साऱ्या मगधदेशाचे धन्यवाद तुम्हाला मिळतील. झालं बाबा, हे पहा दोन शब्द बोललों आणि हा पहा चालता झालों. ( जातो )

कर्को:—कर्नाटक–अरे कर्नाटक. तूं दोस्त ना माझा ? तूं तरी बाबा आपली फिर्याद परत घे.

कर्ना:—वाः वाः ह्मणजे आम्हींही मरावं वाटतं तुझ्या बरोबर ? वाः रे दोस्त ! बस्स, एकदां बोललों तें बोललों. तूं वैष्णव आहेस.

शार्दूल:—चला–वेळ लावूं नका. हरामखोराला जिवंत जाळून टाका.

कर्को:—पाया पडतों–दया करा महाराज, दया करा. ( जातात )

---

## प्रवेश दुसरा

( राजसभा. आसनस्थ उग्रचंद्र, राणी, कादंबिनी, सभासद वगैरे. )

उग्र०:—राणी, तुझ्या विनंतीला मान देऊन चंद्रशेखराला आह्मी अनेक वेळ माफी केली त्याचे परिणाम पाहिलेस ना ? आमचा सुद्धां खून करायला तो तयार

झाला आहे, असं ही कादंबिनी सांगते आहे. काय ह्मणतो पहा–निवेदिता मेली तर आह्मी जिवंत राहणार नाहीं. तूंही जिवंत रहाणार नाहींस. साऱ्यांना ठार मारून टाकीन ह्मणतो ! या मगधेश्वराचा कोपानल किती जाज्वल्य आहे, हें तो विसरून गेला आहे !

राणीः—प्रेमानं माणूस वेडं होतं असं ह्मणतात खरं; पण असलं भयंकर वेड नव्हतं कधीं ऐकलं.

उग्र०ः—अजून शार्दूल कां बरं येत नाहीं ?

कादं०ः—( स्वगत ) वेड्या चंद्रशेखरा, कालसर्पिणीशीं खेळूं पहातोस का ? गोंडस फणेखालीं विषदंत झांकलेला असतो हें कसं विसरलास ? प्रेम करायचं नव्हतं तर माझ्या प्रेमाग्नींत तेल कां ओतलंस ? तुला वाटलं, कीं मीच त्यांत जळून जाईन आणि त्या शेकोटीवर आपली थंडी निवारण करीन–पण आतां पहा–( दचकते ) अगबाई ! हें काय ? ( लोखंडी पिंजऱ्यांत घातलेल्या चंद्रशेखराला घेऊन येतात. शार्दूल येतो. )

उग्र—चंद्रशेखर, हा कालपर्यंत आह्मी तुमच्याशीं स्नेह करीत आलों. आमच्या कृपेमुळेंच तुह्माला सन्मान मिळत होता; आमच्या कृपेमुळंच लोक तुह्माला भीत होते; आमच्या कृपाछत्राखालींच तुमचं सारं ऐश्वर्य होतं त्या कृपेचा मोबदला तुह्मी काय दिला ? एका अपरिचित पाखंडी वैष्णवकन्येस देहांतशिक्षा सांगितली ह्मणून रागानं तुह्मी आमचा देखील घात करायला प्रवृत्त झालांत ! ही देवी कादंबिनी असं सांगते आहे, तें खरं का ?

चंद्र०—खरं आहे महाराज. पण—

उग्र०—बस्स झालं. आतां तुमचं ' पण ' आह्माला ऐकायला नको आहे. विश्वास आणि राजद्रोही गुन्हेगाराला साजेशी शिक्षा भोगायला तयार व्हा. या कुतरड्याला गांवांतल्या चौकांत नेऊन गाळलेल्या रसांत अखंड उभा करा.

चंद्र०—महाराज, मस्तकीं मृत्यू धारण करून आजपर्यंत आपली नोकरी केली. मृत्युभयानं मी कधीं भ्यालों नव्हतों–आजही भीत नाहीं. एवढं खरं, पूर्वी झालं तरी असल्या भयंकर मरणाला माझी तयारी नव्हती. पण आज माझी गुरुदेवता–माझी ज्ञानदात्री–ती बालिका माझे ज्ञानचक्षू उघडती झाली आहे. माझ्यावरची आपली सत्ता आज संपली आहे. मधुर असो किंवा भयंकर असो,

मृत्यु कोणत्याही स्वरुपानं आला तरी त्याला कवटाळण्यास आज मी तयार आहे. ऐका मगधेश्वर, आपली सर्व राजशक्ती एकवटवा, तिचा या देहावर प्रयोग करा. हें जीर्णवस्त्र फाडा, तोडा, जाळा, मला त्याची पर्वा नाहीं.

उग्र:०—हाः हाः हाः हाः चंद्रशेखरा, या उग्रचंडाला तूं अजून ओळखलं नाहींस. मी नुसता मगधेश्वरच नाहीं—मी कवि आहे. मनुष्यप्राण्याच्या देहावर तशीच मनावरही माझी सत्ता आहे. तुझ्या नुसत्या देहालाच नव्हे—तर पण आतां तुझ्या मनाला देखील शिक्षा देतों. शार्दूल, त्या चांडाळणीला इकडे घेऊन या.

राणी:—असंच केलं पाहिजे. याच्यासमोर तिलाही कांहीं तरी भयंकर शिक्षा केली पाहिजे.

कादं०—( स्वगत ) झाली—सूडाची परमावधि झाली. पण—( निवेदितेला घेऊन येतात. )

उग्र०:—होः होः होः चंद्रशेखर, हीच ना ती तुझी प्रणयिनी ! मगधेश्वराची हत्या करण्याची प्रवृत्ति हिच्याच रूपमोहानं तुला उत्पन्न झाली ना ! ठीक आहे. शार्दूल, या डाकिनीचीं वस्त्रं दूर करा आणि तापलेल्या सांडसानं हिच्या देहाचे नाजुक नाजुक लचके काढून ते चंद्रशेखराच्या तोंडीं घाला. सौंदर्यानं तो मोहित झाला आहे—त्या सौंदर्याचा त्याला प्रत्यक्ष आस्वाद घेऊं दे.

चंद्र:०—राक्षस ! राक्षस ! मगधेश्वरा—तूं मूर्तिमंत राक्षस आहेस. आजपर्यंत राक्षसाप्रमाणंच नरहत्त्या करित आलास—पण आतांची ही शिक्षा ऐकून राक्षसाला देखील आपल्या राक्षसपणाची लाज वाटेल! राक्षस कवीची राक्षसी कल्पना पाहून प्रत्यक्ष राक्षसांना उपराति होईल ! महाराज, एकदां हात जोडतों, या बालिकेला शिक्षा देण्यापूर्वी—वाटेल त्या भयंकर रितीनं कां असेना—पण आधीं मला ठार करा.

उग्र०:—हः हः हः हः ! तुझ्या गुरुदेवतेनं—तुझ्या ज्ञानदात्रीनं—या बालिकेनं नवे ज्ञानचक्षू उघडून दिले आहेत ना ! मग असा घाबरतोस कां ! हः हः हः हः !

निवे०:—चंद्रशेखर, कसाही प्रसंग आला तरी चित्ताची चंचलता वैष्णवाला उचित नाहीं. तुम्हीं आपल्याला वैष्णव म्हणवलं आहे, हें ध्यानांत ठेवा. मनाचा लगाम आत्म्याच्या ताब्यांत आहे. देह जसा जड आहे, तसंच मनही. त्या

चिन्मय आत्म्याच्या ठायीं आपलेपणाला मिळवून टाका म्हणजे मनाची चंचलता आपोआप गळून पडेल.

उग्र०:—शार्दूल, पाहतां काय—तापलेले सांडस घेऊन या. ( शार्दूल जातो.)

चंद्र०:—ज्ञाना, विलुप्त हो. धरित्री माते, प्रलयकालच्या घनघोर अंधःकाराच्या आवरणांत दडपून जा. आकाशा, स्तंभच्युत होऊन या धरित्रीचं चूर्णविचूर्ण करून टाक. नाहीं—नाहीं—काय करूं ? हें जग जळून खाक कां होत नाहीं ? महाराज, अजून तरी शांत व्हा. राणी मगधेश्वरी, आपण जातीनं स्त्री आहांत. एका स्त्रीवर होत असलेला असा भयंकर अत्याचार न पाहण्याइतकी स्त्री जातीची नैसर्गिक कोमलता तुमच्या ठायीं तरी जागृत व्हा.

राणी व कादं०:—महाराज—

उग्रचंड:—एक शब्दसुद्धां बोलूं नका. मी राणीचं देखील ऐकणार नाहीं. मगधेश्वरीचा देखील वध करणार होता ना ? मगधेश्वरीनं आणि कादंबिनीनं ही शिक्षा पाहिलीच पाहिजे असा आमचा हुकूम आहे.

राणी व कादं०:—भयंकर—भयंकर.

उग्रचंड:—शार्दुला, पहातोस काय ? गात्रावरण दूर कर.

चंद्र:—नाहीं-नाहीं-आतां राहावत नाहीं. डोळ्यांदेखत असा अत्याचार घडत असतां प्रतिकार केल्यावांचून कसा राहूं ! आजच या नवीन दीक्षेची ही केवढी कठोर परीक्षा ! नारायणा, आजन्म तुला कधीं ओळखलं नाहीं, तुला कधीं हांक मारली नाहीं, तुझं अस्तित्व केव्हांही आठवलं नाहीं; पण मृत्यु हृदयाशीं कवटाळीत असतां निवेदितेच्या स्वराशीं स्वर मिळवून आज तुला ‘ धांव लवकर ’ अशी हांक मारतों आहें. नारायणा, तुला वाटेल तें कर पण प्रभो, माझ्या समक्ष निवेदितेची विटंबना कां करतोस ? ( शार्दूल तिच्या वस्त्राला हात घालतो ) खबरदार—चांडाळा, तिला स्पर्श करूं नकोस ! स्पर्श करूं नकोस ! देवा, तूं अनंत शक्तीधर आहेस ना ? हे सर्व शक्तीमान प्रभो, कुठं असशील तिथून धावून ये. मला तुझा हात दे—नारायणा, भक्तवत्सला, एवढा लोखंडी पिंजरा भंग करण्याची शक्ती मला दे.

उग्रचंड:—हाः हाः हाः हाः—कशी मजा आहे ! शार्दूल, आतां उशीर कां ?